इंग्रजी - मराठी

# स्थापत्य-शिल्प-कोश

(सचित्र)

कोशकार

रामचंद्र विनायक मराठे

साहित्य आणि संस्कृति मंडळ

महाराष्ट्र राज्य

१९६५

पहिली आवृत्ती, १९६५

प्रकाशक :
महाराष्ट्र राज्य
साहित्य आणि संस्कृति मंडळ
सचिवालय (विस्तार भवन), मुंबई-३२

मुद्रक :
शासकीय मुद्रणालय,
नागपूर-१.

किंमत रु. १५

वेष्टन छपाई :
मध्यवर्ति शासकीय मुद्रणालय,
चर्नीरोड, मुंबई-४.

# निवेदन

श्री. रामचंद्र विनायक मराठे यांनी मोठ्या परिश्रमाने हा कोश तयार केला आहे. त्यांची सर्व उमेद स्थापत्य व शिल्प यासंबंधी कार्य करण्यात खर्च झाली आहे. इंग्लिश न जाणणाऱ्या मराठीभाषिक शिल्पकारांच्या सहाय्याने अनेक लहान मोठी कामे करीत असता जे शेकडो मराठी शब्द कारागिरांच्या मुखावाटे बाहेर पडत त्यांची मानसिक नोंद काम करीत असता होत असे. भारतातील कारागिरीची परंपरा भारतीय संस्कृतीइतकीच पुरातन आहे. या कारागिरांच्या भाषेतील शब्दसमृद्धी मोठी आकर्षक अशीच आहे. त्या भाषेत अर्थ सुरेख रीतीने व्यक्त करण्याचे सामर्थ्य आहे. हा कारागीर वर्ग औद्योगिक क्रांतीनंतरच्या काळात हळूहळू, कळत वा नकळत, स्थापत्य व शिल्प यांच्या क्षेत्रातील इंग्लिश शब्दही जसेच्या तसे किंवा बदलून वापरू लागला आहे. त्यामुळे परंपरागत शब्द मागे पडू लागले आहेत किंवा लुप्त होऊ लागले आहेत. कालान्तराने, ही कारागिरांची भाषा व परिभाषा नष्टप्रायही होऊन जाईल. ही नष्ट होण्याच्या अगोदरच ग्रंथनिविष्ट किंवा कोशनिविष्ट झाल्यास देशी भाषांच्या जिवंत व सतेज वाढीला मदत करू शकेल.

प्रस्तुत कोशामध्ये कारागीर वर्गाचे शेकडो शब्द वापरून आधुनिक स्थापत्य व शिल्पसंबंधी इंग्लिश परिभाषेचे विवरण या कोशात जागोजागी केलेले आढळून येईल. हे विवरण करीत असता नवीन संस्कृत पर्यायही यात दिलेले आहेत. भारत सरकारने किंवा निरनिराळ्या विद्यापीठांच्या परिभाषा मंडळांनी तयार केलेली पारिभाषिक शब्दांची सूची या कोशात नियमितपणाने वापरलेली नाही. त्यामुळे सरकारचा हा अधिकृत परिभाषा कोश होय असे म्हणता येणार नाही ही गोष्ट या ठिकाणी ध्यानात ठेविली पाहिजे. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाने हा कोश प्रकाशनासाठी स्वीकारला याचे मुख्य कारण हे आहे की, तांत्रिक क्षेत्रात देशी परिभाषा रूढ होण्याच्या काळात विविध प्रकारचे पर्यायशब्द लेखक व तंत्रज्ञ यांच्यापुढे आले म्हणजे त्यांतील समर्थ, अर्थपूर्ण व देशी भाषांच्या स्वभावास अनुरूप अशा शब्दांची निवड करता यावी. अशी निवड होतानाच जे शब्द टिकाव धरून राहतील तेच त्या त्या विषयांमध्ये योग्य ठिकाणी स्थानापन्न होऊ लागतील. दुसरे कारण असे की, या कोशात स्वीकारलेली परिभाषा मोठ्या प्रमाणात मान्य होवो वा न होवो, परंतु स्थापत्य व शिल्प विषयातील इंग्लिश शब्दांचा अर्थ मराठी वाचकास व मराठी तंत्रज्ञास खुलासेवार कळावा हे या कोशाचे मुख्य प्रयोजन होय. देशी परिभाषा सुचविणे हे या कोशाचे दुय्यम प्रयोजन होय.

या कोशाची रचना करीत असता इंग्लिशमध्ये वापरलेल्या शब्दांच्या व्याकरणाची
केलेली दिसत नाही. ही ह्या कोशातील महत्त्वाची उणीव आहे. ही उणीव
कारण प्रस्तुत कोशकारांचा पेशा भाषाशास्त्रज्ञाचा नाही, केवळ तंत्रज्ञाचा आहे.
भाषाशास्त्रज्ञांच्या सहाय्याने काढून टाकण्याचा प्रयत्न पुन्हा या कोशाची सुधारले
काढण्याचा योग आल्यानंतर करण्यात येईल.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाच्या मुख्य उद्देशाप्रमाणे, मराठी भा
व तंत्र विषयांचे प्रतिपादन करण्याचे सामर्थ्य यावे म्हणून विज्ञान व तंत्र विषयां
ग्रंथ प्रकाशित करणे हा जसा महत्त्वाचा कार्यक्रम स्वीकारला आहे, त्याचबरोबर अ
कोश प्रसिद्ध करणे हाही एक महत्त्वाचा कार्यक्रम आहे.

सचिवालय, मुंबई-३२.
गुढी पाडवा
चैत्र शुद्ध १, शके १८८७
दिनांक २ एप्रिल १९६५.

**लक्ष्मणशास्त्री ज**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि सं

# प्रस्तावना

प्रस्तुत कोशाच्या कल्पनेचे मूळ सुमारे पन्नास वर्षांपूर्वीचे आहे. तेव्हाच्या मुंबई प्रांतात पश्चिम महाराष्ट्रास प्राधान्य असले तरी सबंध गुजरात, कर्नाटकाचे काही जिल्हे व सबंध सिंध यांचाही त्यात समावेश झालला होता. या चारांपैकी कोठल्यातरी एका भागाची मातृभाषा असलेल्या इंजिनियरांची इतर कुठल्याही भागात नेमणूक व बदली त्या काळी होऊ शकत असे. म्हैसूर, मद्रास, बंगाल या सारख्या इतर प्रांतातल्या इंजिनियर होऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना पुण्याच्या तेव्हाच्या एकमेव असलेल्या 'सायन्स कॉलेज' चे जबरदस्त आकर्षण असे. कीर्तिमान व शतायुषी विश्वेश्वरय्या, मूर्ती, आय्यंगार व बोस वगैरे सारख्या प्रथम श्रेणीच्या परप्रांतस्थ इंजिनियरांची नांवे आजही त्या (आजच्या 'इंजिनियरिंग') कॉलेजातल्या विद्यार्थ्यांच्या स्मृति-फलकावर सुवर्णाक्षरांनी लिहिलेली आढळतात. सुदैवाने या प्रथम श्रेणीतल्या विद्यार्थ्यांनी पुढे इंजिनियर झाल्यावरही आपले आयुष्य या प्रांताच्या सेवेतच घालविले.

अशा हिंदी इंजिनियरांना व त्या काळी बहुसंख्य असलेल्या इंग्रज इंजिनियरांना कामाशी प्रत्यक्ष संबंध असलेल्या कमी शिक्षित पण कसबी कारागिरांशी व खात्यातल्या दुय्यम लोकांशी संपर्क ठेवण्यास प्रांतिक प्रतिशब्दांची माहिती असणे अवश्य वाटे. आजच्या प्रमाणे तेव्हाही सरकारी इंजिनियरांना आधारभूत असा सरकार पुरस्कृत 'मेरियट्स स्पेसिफिकेशन्स' या नावाचा ग्रंथ असे. त्या पुस्तकाच्या सुधारलेल्या सन १९१० सालच्या नव्या आवृत्तीत शेवटी अशा शब्दांची वरील कारणासाठी चार भाषात यादी देण्याचे घाटत होते, पण पुस्तकाच्या आटोपशीरपणास बाध येईल म्हणून तो विचार तेव्हा रहित केला असे म्हणतात. त्यानंतरच्या काळात सलोह सिमेंट कॉंक्रीट, अस्फाल्ट, अस्बेस्टॉस, सिमेंट वगैरे सारख्या अनेक नवीन उपक्रमांची व सर्वच शास्त्रे, वेधसाधने व नवीन शोध यांची मोठ्या झपाट्याने वाढ होत राहिलेली असल्याने स्थापत्य-शिल्प-विज्ञानातही एकसारखी भरच पडत चालली आहे. या कारणामुळे तेव्हाच्या छोट्या सरकारी अधिकृत पुस्तकाचा, त्यात वेळोवेळी भर पडून, आज दोन भागांचा 'P. W. D. Hand-Book' हा मोठा ग्रंथ तयार झाला आहे. 'महाराष्ट्र राज्य' नुकतेच जन्मास आल्यामुळे त्या ग्रंथाची अद्ययावत् सुधारलेली आवृत्ती काढण्याची कामगिरी महाराष्ट्र सरकारने श्रीयुत म. ल. चाफेकर ह्यासारख्या अनुभवी अन् तज्ज्ञ इंजिनियरांकडे सोपविली असल्याचे समजते.

वर उल्लेख केलेल्या प्रांतिक प्रतिशब्दांच्या यादीने होणाऱ्या सोईचा प्रश्न आता
प्राप्तीनंतर व त्याहूनही महाराष्ट्र राज्य झाल्यानंतर अनावश्यक व अपुरा आपोआप
आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर म. म. पोतदारांनी म्हटल्याप्रमाणे, ' मराठी भाषिकांच्या सलग
मराठीच प्रधान भाषा म्हणून नांदायला पाहिजे असेल तर मराठी भाषा पुष्ट करण
वेगवेगळ्या शास्त्रीय विषयांच्या मराठी परिभाषेचे स्वतंत्र कोशच निर्माण झाले प
नेत्यांच्या व विद्वानांच्या या संबंधाने असलेल्या मतभेदांना व टीकेला वाव ठेऊ
उपक्रमास सुरुवात करण्याचा सक्रीय प्रयत्न करणे कर्तव्य म्हणून ज्यांना वाटते त्यांनी आ
बसणे कर्तव्यच्युतीचे ठरेल.

वर उल्लेख केल्याप्रमाणे फार पूर्वी उगम पावलेल्या पारिभाषिक शब्दसंग्रह तयार
उत्साही कल्पनेच्या भरात जो तोकडा संग्रह १९२८ च्या सुमारास लेखकाने केला त
वही व्यावसायिक निवृत्तीनंतर त्यास या नवीन उपक्रमाची स्फूर्ती देती झाली,
नमूद करावेसे वाटते.

स्थापत्यशास्त्राचा संबंध इतक्या वेगवेगळ्या शास्त्रांशी निगडीत आहे की स्थ
विशारदांना स्वतःच्या मुख्य विषयाखेरीजही व्यवसायाला सहाय्यभूत अशा खालील
सामान्यज्ञान तरी आवश्यक असते. स्वतःच्या मुख्य विषयाखेरीज पुढील विषयां
घेणे त्यास प्राप्तच असते :—

| | |
|---|---|
| **Arboriculture** वृक्षवर्धन | **Metallurgy** धातु शास्त्र |
| **Archæology** पुराणवस्तु शास्त्र | **Mineralogy** धातु-कर्म विद्या |
| **Architecture** वास्तु-सौंदर्य शास्त्र | **Ship-building** जहाज-बांधणी |
| **Geology** भूस्तर शास्त्र | **Strength of materials** साध |
| **Mechanics** यंत्र शास्त्र | **Stress analysis** नेट पृथक्करण- |

हा कोश विशेषतः स्थापत्य, शिल्प व या दोहोंशी निगडीत असलेल्या स्थाप
शाखांच्या विद्यार्थ्यांना विद्यापीठातील उच्च शिक्षण मराठी भाषेतून देण्याच्या क
पडेल अशा दर्जाचा व्हावा या हेतूनेच रचिला असला तरी वरील कारणांमुळे त्या
शिल्प-कोश ' हे नाव देणेच सार्थ होईल.

आजतागायत प्रसिद्ध झालेल्या मराठी कोशातून किंवा शास्त्रीय ग्रंथातून वापरलेल्य
शब्दांपैकी बहुसंख्य शब्द आज प्रचारात तर नाहीतच, उलट लुप्त होण्याच्या मा
पारतंत्र्यामुळे व राजाश्रयाच्या अभावी कोठलीही प्रादेशिक भाषा, स्वातंत्र्य
राज्यभाषा होईपर्यंत चलनी भाषा होणे अशक्य असते. मराठी ही राज्यभा
माध्यमिक विद्यालयातून व विद्यापीठातून मिळणारे उच्च शास्त्रीय शिक्षणही म
देण्यास अडचण न पडू देण्याइतका भाषेचा विकास साधण्याची व लुप्त होत चाल
पुनरुज्जीवन करण्याची आता वेळ आलेली आहे.

महाविद्यालयीन शिक्षणात तर राहोच पण दुय्यम शिक्षणात देखील प्रादेशिक भाषांचा माध्यम म्हणून प्रवेश झाला नव्हता असा तो स्वातंत्र्यपूर्वकाळ होता. त्या काळात बुद्धिमान पण गरिबीमुळे जास्त शिक्षण घेऊ न शकलेल्या अशा हातावर पोट भरणाऱ्या श्रमजीवी लोकांची व्यावहारिक यांत्रिक शिक्षण घेऊन स्वतःचा उत्कर्ष साधावयाची धडपड व महत्त्वाकांक्षा साहजिकच असे. अशा लोकांच्या उपयोगासाठी विशिष्ट शास्त्रातील दर्दी लोकांनी त्या त्या विषयासंबंधी लिहिलेली जी मराठी पुस्तके असत त्यातून इंग्रजी पारिभाषिक शब्दांचाच वापर देवनागरी लिपीत करून प्रतिपाद्य विषयांचे स्पष्टीकरण केलेले आढळते. पारतंत्र्यातल्या जीवनसंग्रामाच्या धडपडीच्या काळात ते धकूनही जात असे, इतकेच नव्हे तर अशा पुस्तकांच्या अनेक आवृत्त्या काढाव्या लागण्याइतकी त्यांना मागणीही असे. पण ह्यापुढे वैज्ञानिक व तांत्रिक शिक्षणातील परिभाषेसाठी इंग्रजी भाषेपुढे तोंड वेंगाडण्याची पाळी चालू राहिली तर मिळविलेल्या स्वातंत्र्याला अर्थच उरणार नाही.

शास्त्रीय परिभाषेचा हा कोश असल्यामुळे त्याचे केवळ शब्दकोशाचेच स्वरूप ठेवल्यास ते निरर्थकच होईल व याउलट ज्ञानकोशाप्रमाणे विशिष्ट शब्दाने प्रतीत होणाऱ्या विषयाची पूर्ण माहिती देण्याचा खटाटोप करणेही व्यावहारिकदृष्ट्या दिरंगाईचे होईल. या कारणामुळे मधला मार्ग पत्करून विशिष्ट शब्दाने त्या विषयाचा शक्य तितका जास्त बोध होऊन त्या विषयाचे पूर्ण ज्ञान मिळवण्याची अभ्यासूंची जिज्ञासा वाढेल इतपत माहिती देऊन हा कोश संमिश्र स्वरूपाचा ठेवला आहे. याच्या पुढची पायरी गाठू इच्छिणाऱ्यांसाठी विशिष्ट शास्त्रीय शाखेपुरते वेगवेगळे व्याख्याकोश (वस्तुतः ते ज्ञानकोशच होतील) पुढील काळात तयार करण्यास विद्वानांना पुष्कळच वाव आहे.

शास्त्रीय परिभाषेसंबंधाने एक गोष्ट येथे विशेषत्वाने नमूद करावीशी वाटते ती अशी की स्थापत्य किंवा शिल्प या शास्त्रांची परिभाषा इतर शास्त्रांइतकी सामान्य माणसास समजण्यास अवघड जात नाही. सर्वमान्य, उच्चार सुलभ, श्रवणसुगम, सुटसुटीत व यथार्थ अशा अपारिभाषिक शब्दांत पारिभाषिक शब्दांचे स्पष्टीकरण केल्यास सामान्य माणसास विनासायास समजू शकते याचे कारण स्थापत्यशिल्पाच्या निर्मितीच्या घडामोडी दैनंदिन व्यवहारात व त्याच्या डोळ्या-समोरच चालू असतात हेच आहे. अर्थात् इंग्रजी शब्दांनी आज अनेक वर्षे घेतलेली मनाची पकड हलके हलके ढिली होऊन नवीन समानार्थी शब्द त्या त्या अर्थाने रूढ होण्यास काही काळ जावा लागेल हे उघडच आहे.

या कोशात सर्वच पारिभाषिक शब्दांना समानार्थी प्रतिशब्द दिले आहेत असे नाही. अर्थाचे सूक्ष्म भेद ज्यात उतरले आहेत अशा समाधानकारक शब्दांच्या अभावी फक्त पुरेसे स्पष्टीकरणच केले आहे. हेतू हा की विद्यालयात मराठीचा पूर्णपणे आवश्यक असा वापर चालू होऊन ती भाषा प्रचलित झाली की आपोआपच योग्य असे मनाची पकड घेणारे यथार्थ प्रतिशब्द निर्माण होऊन

वर उल्लेख केलेल्या प्रांतिक प्रतिशब्दांच्या यादीने होणाऱ्या सोईचा प्रश्न आता स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर व त्याहूनही महाराष्ट्र राज्य झाल्यानंतर अनावश्यक व अपुरा आपोआपच ठरला आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर म. म. पोतदारांनी म्हटल्याप्रमाणे, 'मराठी भाषिकांच्या सलग मुलुखात मराठीच प्रधान भाषा म्हणून नांदायला पाहिजे असेल तर मराठी भाषा पुष्ट करण्याकरिता वेगवेगळ्या शास्त्रीय विषयांच्या मराठी परिभाषेचे स्वतंत्र कोशच निर्माण झाले पाहिजेत'. नेत्यांच्या व विद्वानांच्या या संबंधाने असलेल्या मतभेदांना व टीकेला वाव ठेऊनही अशा उपक्रमास सुरुवात करण्याचा सक्रीय प्रयत्न करणे कर्तव्य म्हणून ज्यांना वाटते त्यांनी आता स्वस्थ बसणे कर्तव्यच्युतीचे ठरेल.

वर उल्लेख केल्याप्रमाणे फार पूर्वी उगम पावलेल्या पारिभाषिक शब्दसंग्रह तयार करण्याच्या उत्साही कल्पनेच्या भरात जो तोकडा संग्रह १९२८ च्या सुमारास लेखकाने केला त्याची जुनी वही व्यावसायिक निवृत्तीनंतर त्यास या नवीन उपक्रमाची स्फूर्ती देती झाली, एवढेच येथे नमूद करावेसे वाटते.

स्थापत्यशास्त्राचा संबंध इतक्या वेगवेगळ्या शास्त्रांशी निगडीत आहे की स्थापत्यशास्त्र विशारदांना स्वतःच्या मुख्य विषयाखेरीजही व्यवसायाला सहाय्यभूत अशा खालील विषयांचे सामान्यज्ञान तरी आवश्यक असते. स्वतःच्या मुख्य विषयाखेरीज पुढील विषयांचीही दखल घेणे त्यास प्राप्तच असते :—

| | |
|---|---|
| **Arboriculture** वृक्षवर्धन | **Metallurgy** धातु शास्त्र |
| **Archæology** पुराणवस्तु शास्त्र | **Mineralogy** धातु-कर्म विद्या |
| **Architecture** वास्तु-सौंदर्य शास्त्र | **Ship-building** जहाज-बांधणी |
| **Geology** भूस्तर शास्त्र | **Strength of materials** साधनांचे बलाबल |
| **Mechanics** यंत्र शास्त्र | **Stress analysis** नेट पृथक्करण—विश्लेषण. |

हा कोश विशेषतः स्थापत्य, शिल्प व या दोहोंशी निगडीत असलेल्या स्थापत्याच्या मुख्य शाखांच्या विद्यार्थ्यांना विद्यापीठातील उच्च शिक्षण मराठी भाषेतून देण्याच्या कामी उपयोगी पडेल अशा दर्जाचा व्हावा या हेतूनेच रचिला असला तरी वरील कारणांमुळे त्यास 'स्थापत्य-शिल्प-कोश' हे नाव देणेच सार्थ होईल.

आजतागायत प्रसिद्ध झालेल्या मराठी कोशातून किंवा शास्त्रीय ग्रंथांतून वापरलेल्या पारिभाषिक शब्दांपैकी बहुसंख्य शब्द आज प्रचारात तर नाहीतच, उलट लुप्त होण्याच्या मार्गावर आहेत. पारतंत्र्यामुळे व राजाश्रयाच्या अभावी कोठलीही प्रादेशिक भाषा, स्वातंत्र्य प्राप्त होऊन राज्यभाषा होईपर्यंत चलनी भाषा होणे अशक्य असते. मराठी ही राज्यभाषा झाल्यामुळे माध्यमिक विद्यालयातून व विद्यापीठातून मिळणारे उच्च शास्त्रीय शिक्षणही मराठी भाषेतूनच देण्यास अडचण न पडू देण्याइतका भाषेचा विकास साधण्याची व लुप्त होत चाललेल्या शब्दांचे पुनरुज्जीवन करण्याची आता वेळ आलेली आहे.

महाविद्यालयीन शिक्षणात तर राहोच पण दुय्यम शिक्षणात देखील प्रादेशिक भाषांचा माध्यम म्हणून प्रवेश झाला नव्हता असा तो स्वातंत्र्यपूर्वकाळ होता. त्या काळात बुद्धिमान पण गरिबीमुळे जास्त शिक्षण घेऊ न शकलेल्या अशा हातावर पोट भरणाऱ्या श्रमजीवी लोकांची व्यावहारिक यांत्रिक शिक्षण घेऊन स्वतःचा उत्कर्ष साधावयाची धडपड व महत्त्वाकांक्षा साहजिकच असे. अशा लोकांच्या उपयोगासाठी विशिष्ट शास्त्रातील दर्दी लोकांनी त्या त्या विषयासंबंधी लिहिलेली जी मराठी पुस्तके असत त्यातून इंग्रजी पारिभाषिक शब्दांचाच वापर देवनागरी लिपीत करून प्रतिपाद्य विषयांचे स्पष्टीकरण केलेले आढळते. पारतंत्र्यातल्या जीवनसंग्रामाच्या धडपडीच्या काळात ते धकूनही जात असे, इतकेच नव्हे तर अशा पुस्तकांच्या अनेक आवृत्त्या काढाव्या लागण्याइतकी त्यांना मागणीही असे. पण ह्यापुढे वैज्ञानिक व तांत्रिक शिक्षणातील परिभाषेसाठी इंग्रजी भाषेपुढे तोंड वेंगाडण्याची पाळी चालू राहिली तर मिळविलेल्या स्वातंत्र्याला अर्थच उरणार नाही.

शास्त्रीय परिभाषेचा हा कोश असल्यामुळे त्याचे केवळ शब्दकोशाचेच स्वरूप ठेवल्यास ते निरर्थकच होईल व याउलट ज्ञानकोशाप्रमाणे विशिष्ट शब्दाने प्रतीत होणाऱ्या विषयाची पूर्ण माहिती देण्याचा खटाटोप करणेही व्यावहारिकदृष्टया दिरंगाईचे होईल. या कारणामुळे मधला मार्ग पत्करून विशिष्ट शब्दाने त्या विषयाचा शक्य तितका जास्त बोध होऊन त्या विषयाचे पूर्ण ज्ञान मिळवण्याची अभ्यासूंची जिज्ञासा वाढेल इतपत माहिती देऊन हा कोश संमिश्र स्वरूपाचा ठेवला आहे. याच्या पुढची पायरी गाठू इच्छिणाऱ्यांसाठी विशिष्ट शास्त्रीय शाखेपुरते वेगवेगळे व्याख्याकोश (वस्तुतः ते ज्ञानकोशच होतील) पुढील काळात तयार करण्यास विद्वानांना पुष्कळच वाव आहे.

शास्त्रीय परिभाषेसंबंधाने एक गोष्ट येथे विशेषत्वाने नमूद करावीशी वाटते ती अशी की स्थापत्य किंवा शिल्प या शास्त्रांची परिभाषा इतर शास्त्रांइतकी सामान्य माणसास समजण्यास अवघड जात नाही. सर्वमान्य, उच्चार सुलभ, श्रवणसुगम, सुटसुटीत व यथार्थ अशा अपारिभाषिक शब्दांत पारिभाषिक शब्दांचे स्पष्टीकरण केल्यास सामान्य माणसास विनासायास समजू शकते याचे कारण स्थापत्यशिल्पाच्या निर्मितीच्या घडामोडी दैनंदिन व्यवहारात व त्याच्या डोळ्या-समोरच चालू असतात हेच आहे. अर्थात् इंग्रजी शब्दांनी आज अनेक वर्षे घेतलेली मनाची पकड हलके हलके ढिली होऊन नवीन समानार्थी शब्द त्या त्या अर्थाने रूढ होण्यास काही काळ जावा लागेल हे उघडच आहे.

या कोशात सर्वच पारिभाषिक शब्दांना समानार्थी प्रतिशब्द दिले आहेत असे नाही. अर्थाचे सूक्ष्म भेद ज्यात उतरले आहेत अशा समाधानकारक शब्दांच्या अभावी फक्त पुरेसे स्पष्टीकरणच केले आहे. हेतू हा की विद्यालयात मराठीचा पूर्णपणे आवश्यक असा वापर चालू होऊन ती भाषा प्रचलित झाली की आपोआपच योग्य असे मनाची पकड घेणारे यथार्थ प्रतिशब्द निर्माण होऊन

भाषेत रुजले म्हणजे ऐसपैस स्पष्टीकरणाची जागा ते काबीज करतील व स्पष्टीकरण फक्त सामान्य माणसाची जिज्ञासा पुरविण्यापुरतेच कोशात राहील.

बऱ्याचशा शास्त्रीय भाषांचा असा पुण्याच्या महाराष्ट्र कोशमंडळाने प्रसिद्ध केलेला शास्त्रीय परिभाषा कोश हा एकच कोश आजपर्यंत प्रसिद्ध असून, त्यात इंग्रजी शास्त्रीय शब्दांचे बहुश: हिंदी, मराठी व क्वचित् गुजराती पर्याय दिले आहेत. त्यात निव्वळ स्थापत्य व शिल्प विषयक शब्द फार थोडे व दनंदिन व्यवहारातील असे बहुश: मुळीच नसल्याने इंग्रजी-मराठी असा स्वतंत्र स्थापत्य-शिल्प-कोश मराठीत नाहीच म्हटले तरी चालेल. या खेरीज उल्लेख करण्याजोगा महत्त्वाचा म्हणजे ६० वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेला, नी. ब. रानडे ह्यांचा 'दि ट्वेन्टीएथ सेंचुरी इंग्लिश-मराठी डिक्शनरी'. हा कोश प्राधान्येकरून वाङ्मयीन असला तरी त्यात तावत्काल-पर्यंत मराठी लेखनात वापरले गेलेले बहुतेक शास्त्रीय व पारिभाषिक शब्दांचा समावेश परिश्रमपूर्वक केला आहे. त्याच्या निर्मितीसाठी स्वत: संपादकाने रेल्वे व गोद्यातील कारखाने, कापडगिरण्या व बडोद्याचे कलाभवन वगैरे सारख्या स्थानांना भेटी देऊन त्यातील विद्वान व कसबी संबंधित लोकांशी विचारविनिमय करून मिळविलेले बहुतेक शास्त्रांच्या पारिभाषिक शब्दांचे मराठी रूढ पर्याय स्वत:च्या कोशात जतन करून ठेवलेले आहेत. त्या कोशात स्थापत्य-शिल्प शाखेच्या वाट्यास आलेले शब्द थोडे थोडके नाहीत.

अशा शब्द संग्रहाचे दोन प्रकार म्हणता येतील. एक म्हणजे प्रत्यक्ष कामाच्या निर्मिती-संबंधातील कसबी व बिनकसबी कामगारांनाही अवगत असलेले असे व्यावहारिक पारिभाषिक शब्द व दुसरा प्रकार म्हणजे या विषयाचे शास्त्रीय, माध्यमिक व विद्यालयीन शिक्षण मराठी माध्यमातून देण्यास लागणारे शास्त्रीय पारिभाषिक शब्द. पहिल्या प्रकारात अहेतुकपणे पण व्याकरणाच्या रूढ नियमांना धरून निर्माण झालेले व बोलभाषेत रुळलेले पुष्कळसे शब्द असतात. तसेच काही अपभ्रष्ट असे इंग्रजी शब्दही असतात. अशांपैकी पूर्वोक्त मराठीकरण झालेले शब्द हे देखील एक प्रकारे भाषेची संपत्तीच म्हटली पाहिजे.

पुणे विद्यापीठातर्फे नियुक्त झालेली मराठी परिभाषा समिती व महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे नियुक्त झालेले परिभाषा मंडळ यांच्यातर्फे वेगवेगळ्या शास्त्रांना उपयोगी पडणाऱ्या शास्त्रीय परिभाषा निश्चित करून त्यांच्या संज्ञावलीच्या काही पुस्तिका पूर्वी प्रसिद्ध केल्या आहेत, व अलिकडेच सन १९६२ साली अशा पुस्तिकांचे संकलन करून परिभाषा कोशाची दुसरी आवृत्ती महाराष्ट्र साहित्य परिषदेने काढली आहे. त्यात विशेषत: शास्त्रीय परिभाषा मंडळातर्फे प्रसिद्ध झालेल्या पुस्तिकांपैकी जलवैजिक व क्षेत्रपायनिक या वार्तक क्षेत्रातील दोन महत्त्वाच्या शाखांच्या संज्ञावल्यांचा उल्लेख प्रामुख्याने केला पाहिजे. सुदैवाने मंडळाला या कामी चार निष्णात वार्तकवर्यांचे सहकार्य लाभले होते. दीड तपापूर्वी झालेल्या या प्रयत्नानंतर दुर्दैवाने निव्वळ वार्तक व शिल्प क्षेत्रातील शाखांच्या अशा आणखी संज्ञावल्या तयार झाल्याचे दिसत नाही.

प्रस्तुत कोशात काही इंग्रजी पारिभाषिक शब्दांना मोजके मान्यपर्याय न देता अनेक पर्याय दिले आहेत. त्यातील काही वेगवेगळया अर्थाने किंवा संदर्भाने आहेत त्यांची गोष्ट वेगळी, पण जेथे सर्वांचा एकच अर्थ अभिप्रेत आहे तेथे ते सर्व पर्याय मान्य असेच आहेत, असा दावा नाही ; केवळ गेल्या शंभर वर्षात ते वापरले गेले आहेत म्हणूनच दिले आहेत. हेतू हा की विशिष्ट शब्दाची मान्यता विशिष्ट बाबतीत वादग्रस्त असण्याचा संभव असल्यास वरच्यावर चिकित्सा होऊन सर्वमान्यतेच्या कसोटीस जे शब्द उतरतील तेच अखेर टिकून चलनी होतील पण तोपर्यंत तरी बाकीचे शब्द लुप्त होऊ नयेत. या गोष्टीचा खास उल्लेख करण्याचे कारण असे की मान्यतेचा निर्वाळा दिलेल्या काही पर्यायांतसुद्धा वेगवेगळ्या संस्थांच्या संज्ञावल्यात एकवाक्यता नसल्याची काही उदाहरणे सापडतात.

शास्त्रीय परिभाषा कोशाबद्दलचे इंग्रजी वाङमय पाहिले म्हणजे स्वातंत्र्य मिळून दीड तप होऊन गेले असताही आपण किती मागे आहोत याची जाणीव तीव्रतेने झाल्याखेरीज राहात नाही. इंग्रजी भाषा आधीपासूनच अद्ययावत् कोशांच्या वेगवेगळ्या प्रकारांनी समृद्ध असताही Chambers' Technical Dictionary हिच्यासारख्या सर्वमान्य व हजारांवर पाने असलेल्या कोशाची अद्ययावत् सुधारलेली आवृत्ती तर निघाली आहेच पण याखेरीज देखील नवीन नवीन शास्त्रीय परिभाषा कोश काढण्याची त्यांची धडपड चालूच आहे. या ठिकाणी पेंग्विन प्रकाशनातर्फे सन १९५८ साली प्रसिद्ध झालेल्या 'A Dictionary of Civil Engineering' या पुस्तकाच्या प्रस्तावनेतला पुढील उतारा देण्याचा मोह आवरत नाही :—

> "'Buttock, Plum, and Limpet' have engineering senses, and even 'Coal Pumping, Cementation', 'Methane Drainage' and 'Drilling Fluids' could, interest the layman. Tanned explorers with sunburnt knees and frost-bitten noses might have brought back from their travels 'A Black Gang' with a 'Dog Whipper' or two. These terms have their poetic attraction. But there is another reason for our interest. Engineers feel they need to know, even if they never use the knowledge, whether 'to span a 30 feet gap', 'A Hollow-Pot Floor' or 'A Prestressed Concrete Floor' is needed or whether to keep 60 feet of water out of a building site they must use 'A Celular Cofferdam'. This book tries to explain some of these terms to laymen and to non-specialist engineers."

मराठी परिभाषा कोश शास्त्रीय वाङमयाला चालना देऊन मराठी भाषेचे हे दालन भविष्य काळात समृद्ध व्हावयास सहाय्यक व्हावा याच केवळ हेतूने व आपल्यापुरते भाषाजननीसंबंधीचे आपले कर्तव्य, अल्पांशाने का होईना, बजावले ह्याचे समाधान लाभावे ह्या साठीच ही माझी

कृती प्रसिद्ध होऊ देण्याचे धाडस मी करीत आहे. व तेही महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाने सरकारी प्रकाशन म्हणून घेण्याचे मान्य केल्यानेच शक्य झाले आहे हे येथे कृतज्ञतेने नमूद करणे माझे कर्तव्यच समजतो. कल्पनासृष्टीतल्याच पण भविष्य काळात जे कोश विद्वान शास्त्रज्ञांकडून तयार होतील ते अर्थातच एकापेक्षा एक असे सर्वांगसुन्दर होऊ लागतील ; अशा त्या कोशांपुढे प्रस्तुत कोश तुलनाही न करण्याइतका लघु व अपूर्ण भासू लागला तरीही लेखकाच्या आत्म्यास त्यामुळे आनंदच वाटेल.

असो. तीन तपापूर्वीचे छोटेसे स्वप्न गेल्या सात वर्षांच्या परिश्रमानंतर ईश्वरकृपेने आज साकार होत आहे. ज्याच्यात मन व्यग्र राहिल्यामुळे मला मोठाच विरंगुळा मिळाला, असा हा उद्योग आज संपत आहे याचा थोडासा विषादही वाटतो.

ज्यांच्याशी माझा स्नेह झाल्यामुळे अशा तऱ्हेच्या उद्योगाबद्दल मला गोडी उत्पन्न झाली व आपण प्रत्यक्ष काही करावे असे वाटू लागले त्या अकाल मृत्यूने दृष्टीआड केलेले माझे विद्वान व प्रेमळ बालमित्र माधव ज्यूलिअन यांच्या प्रेमळ स्मृतीस ही अल्पकृती मी सादर अर्पण करीत आहे.

माझे विद्वान व प्रथितयश हितचिंतक व कराची आणि कलाभवन या स्थापत्य विद्यालयांचे प्राचार्य काकासाहेब जुन्नरकर यांनी आपला अमूल्य वेळ खर्चून व हस्तलिखित वाचून जी महत्त्वाची चर्चा करून उत्साहपूर्ण उत्तेजन दिले त्याबद्दल त्यांचे किती व कसे आभार मानावे !

निवृत्त चीफ इंजिनियर श्री. म. ल. चाफेकरसाहेब यांनी अत्यंत कार्यव्याप्त असताही सवड काढून चार-पाच तास का होईना या पुस्तकाचे हस्तलिखित चाळून पाहून या उपक्रमाचे कौतुक-पूर्ण मूल्यमापन करून मला अत्यंत उपकृत केले आहे.

सुप्रसिद्ध चरित्रलेखक व संपादक श्री. गं. दे. खानोलकर (तात्या) व त्यांचे उदयोन्मुख व तरुण आर्किटेक्ट चिरंजीव मधुकर या पिता-पुत्रांचे वेळोवेळी मिळणारे प्रोत्साहन व त्यांच्या खाजगी ग्रंथसंग्रहाचे मला असलेले मुक्तद्वार यांनीच माझी कामगिरी इतकी सुसह्य व कष्टसाध्य केली. त्यांचे ऋण अमोल आहे.

(महाशिवरात्र)
माघ कृष्ण १३, शके १८८६
दिनांक १ मार्च १९६५.

**रामचंद्र विनायक मराठे.**

# इंग्रजी-मराठी
# स्थापत्य-शिल्प-कोश



**A,** a प्रत्येक, एकेक, हर, दर, प्रति; जसे Rs. 5 a man प्रत्येक माणसास पाच रुपये किंवा Rs. 100 a year दर वर्षास शंभर रुपये. **A-Amplifier** A-प्रवर्धक.

**A1** पहिल्या प्रतीचा, उत्कृष्ट स्थितीत असलेला; हा शब्द विशेषेकरून जहाजांना लावतात व इतर ठिकाणीही याच अर्थी उपयोग करतात.

**Aaron's rod** सर्प गुंडाळलेली काठी (आरन शिल्प), स्तंभदंड.

**AB-Amplifier** AB-प्रवर्धक.

**Abaca** नौकाविषयक साधनांना व सर्वसाधारण बांधकामात लागणाऱ्या दोरखंडांना अत्यंत उपयुक्त असे 'अॅबेका' झाडाचे तंतु. **Manilla** सण-ताग-तंतु.

**Abacus** (चिनी लोकांचे) हिशेब करण्याचे फळचासारखे

Abacus: गणनयंत्र

Abacus: स्तंभशीर्ष-फलक

यंत्र, मणियंत्र, गणनयंत्र, प्राथमिक शाळातील तारांतून लावलेल्या रंगीत लाकडी गोटयांची चौरस किंवा लंबचौरस चौकट. **Phalaka, Palagai** (फालका, पलकै) स्तंभशीर्ष-फलक; आर्किट्रेव्ह खालील स्तंभशीर्षाच्या माथ्यावरचा बैठा ढापा. याचे डॉरिक कोरिन्थिअन व गॉथिक असे प्रकार आहेत.

**Abaft** वरामी, नौकेच्या-नावेच्या-तारवांच्या मागल्या भागास, नौका वगैरेंच्या पश्चिम भागी, वरामाकडे, नावेच्या मागल्या भागाकडे.

**Abamurus** पुस्तीची भिंत, पडभिंत.

**Abatis, Abattis** शत्रूला अडथळा करण्यासाठी किल्ल्या-पुढे केलेले झाडाझुडुपांचे कुंपण.

**Abatjour** साणे, धारे, झारे, धुराडे, गवाक्ष.

**Abattoir** कसाईखाना, ढोरे वगैरे कापण्याची जागा.

**Abbey** मठ, योगिगृह, योग्यालय, विहार.

**Abbreviation** संक्षेप.

**Abeam** नावेच्या कण्याशी काटकोन करणाऱ्या दिशेत.

**Abelian integral equation** आबेलचे समाकल समीकरण.

**Aberrant** अपोपलक्षक.

**Aberrate** केंद्र सोडून जाणे, केंद्रीभवन न होणे, अपायन होणे. **Aberration** विपथन, विचलन, विभ्रमण, किरणांचे अकेंद्रीभवन, किरण विचलन, अपभ्रंष, प्रच्यवन, अपायन. **Abberration of lenses** यवापायन. **Aberration of light** प्रकाशापायन, प्रकाशभ्रंश, प्रकाश-प्रच्यवन. **Chromatic aberration** रंगविक्षेप, वर्णविक्षेप, रंगापायन, वर्णीय विचलन. **Constant of aberration** प्रच्यवनांक. **Spherical aberration** गोलापायन, गोलीय विचलन.

**Ablation** पाण्याच्या सतत आघाताने दगड घासून जाणे.

**Ablution stone** स्नानाची शीळ-शिला, स्नानशिला, स्नानाची पाथर.

**Abney level** (अॅबने लेव्हल) चढ किंवा उताराचे प्रमाण दहा किंवा त्याहूनही कमी लंबापर्यंत दाखविणारे दुर्बिण व पाणसळ असलेले यंत्र.

Abney level: अॅबने लेव्हल

**Abnormal** क्रमाविरुद्ध, प्रमाणाबाहेरचा, वाजवीपेक्षा जास्त, अनिमित, असाधारण, असामान्य. **Abnormality, Abnormity** क्रम-विरुद्धता, विलक्षणता.

**Abram's Law** सिमेंट कॉंक्रीटातील पाणी व सिमेंट यांच्या प्रमाणाबद्दल 'अब्रामचा नियम'. अगोदर फेरेट याने फ्रान्समध्ये व नंतर अमेरिकेत 'डफ अब्राम' याने या नियमाचा शोध लावला. सिमेंट कॉंक्रीट किंवा रद्दा यांची बळकटी केवळ मिश्रणातील पाण्याच्या व सिमेंटच्या वजनाच्या प्रमाणावर अवलंबून असते. थरकणीरहित अशा कामाच्या बाबतीत हे (पा. सि.) प्रमाण किमान १ : ०·४५ असावे. सिमेंट आळण्याच्या रासायनिक क्रियेसाठी किमान पाण्याचे प्रमाण १ : ०·२५ पुरेसे असले तरी रेती आणि खडी चांगली भिजण्यासाठी हे प्रमाण वाढविणे आवश्यक आहे व म्हणून थरकणीयुक्त किंवा निर्वात कॉंक्रीटच्या बाबतीत देखील पा. सि. प्रमाण १ : ०·३५ च्या पेक्षा खाली आणता कामा नये.

**Abrasion** (वापरून नाण्याला आलेली) झीज, अपघर्षण.
**Abridged** संक्षिप्त.
**Abrupt** तुटक्या कड्याचा, छिन्नतट, प्रपातमय.
**Absciss, Abscissa** (*pl.* **abscisses, abscissas, abscissæ**) (या उलट Ordinate म्हणजे भुजा) कोटी, कोटि-भुज, भुज, भुजांतर, कोटिमान, निर्णायक; याच्या योगाने एखाद्या बिंदूच्या स्थानाचा निर्णय करता येतो; प्रभवापासून तो बिंदु किती अंतरावर आहे हे काढता येते.
**Absolute** निरपेक्ष, परम, केवल (जसे:–**cold**, –**curvature**, –**motion**, –**space**, –**temperature**, –**value**, –**zero**). –**alcohol** विशुद्ध मद्यसार. –**humidity, Humidity of air** मौलिक आर्द्रता, हवेच्या एकमातील आर्द्रतेचा भार. –**temperature scale** मौलिक तपावली. –**zero** मूलशून्य.
**Absorb** शोषणे, शोषण करणे. **Absorptimeter, Absorbiometer** शोषण मापक. **Absorption** शोषण, अपशोषण, आशोषण, प्राशन, शुष्कीकरण. **Absorption well** शोषक विहीर. **Absorption of light** आलोका-शोषण, आलोकापशोषण. **Absorption loss** स्वालोप. **Absorption of rays** किरणांचे अपशोषण. **Absorption and radiation** अपशोषण आणि विसर्जन. **Absorptive** शोषणक्षम, शोषण करण्याची शक्ति असणारा. **Absorptivity** शोषणक्षमता. **Absorbability** शोषण करण्याची पात्रता-योग्यता-शक्ति. **Absorbent** शोषक.
**Abstract** अडाव-वा, फेरिस्त, गोश्‍वारा, गोश्वारा, गोष्वारा, गोस्वारा, समस्तिका, सार, साधी संख्या, शुद्ध गणित. काढून घेणे, निष्कासन करणे. अरूपता, अमूर्त. –**of rates** दरांचा गोश्वारा, प्रत्यय-पत्रिका.
**Absurd** विसंगत, अयुक्तिक, असंबद्ध.
**Abutment** अंत्यपाद, कर्दभित, धरित्रीभित, भुजा (कमानीचा दाब जीवर पडतो ती भिंत), प्रतिष्टम्भ.
**Abutment pier** धारण स्तंभ, प्रतिनिष्टम्भ.
**Abuttal** जमिनीची हद्द-सीमा-सरहद्द, शीव.
**Abyss** अतिशय खोल आखात, अगाधजल-डोह-हृद. **Abyssal, Abysmal** अतल, गभीर, खोल. **Abyssal deposit** पातालीय-गभीर निक्षेप.
**Abyssinian tube-well** वीस फुटापर्यंतच हात पंपाने पाणी खेचता येईल अशी नलिका-विहीर.
**A. C.** पहा Alternating current.
**Academy** अकादमी, पाठशाळा, सरस्वती मंदिर, विद्यालय, विद्यापीठ.
**Acanthus** अॅकँथस. कोरिन्थिअन शिल्पातील स्थंभ-शीर्षाच्या खालच्या भागातील काटेरी पानांचे नक्षीकाम.

Acanthus : अॅकेंथस नक्षीकाम

**Accelerate** लवकर घडवून आणणे, वेगवर्धन करणे, वेग अथवा गति वाढविणे, प्रजवन करणे. **Accelerated motion** वर्धमान गति. **Accelerator** वेगवर्धक. **Acceleration** प्रवेग, प्रजवन, वेगवर्धन (क्रिया), त्वरण, वृद्धि. **Accelerometer** वेगवर्धनमापक, त्वरणमापी.
**Access** प्रवेश, मार्ग, द्वार, वाट, येण्याजाण्याची मोकळीक, मुक्तद्वार. **Access eye** सांडपाण्याचे किंवा मैलापाण्याचे वगैरे नळ चोंदले असल्यास ते साफ करण्यासाठी सोईस्कर जागी लावलेला पेचाचा दटचा.
**Accidental colour** औपाधिक रंग. –**images** आगंतुक प्रतिबिंबे. –**light** औपाधिक प्रकाश. –**point** आगंतुक बिंदु. –**vanishing point** अनिश्चित अंतर्हित बिंदु.
**Acclivity** चढ, चढण, चढाव, घाटी, डाग. **Acclivitous, Acclivous** चढता, चढावाचा, चढणीचा.
**Accommodation** अनुप्रभावन, अनुभावन. –**ladder** जहाजावर चढण्या-उतरण्यासाठी ठेवलेली हलकी शिडी, पोत-शिडी, तागड. –**road** सार्वजनिक किंवा खाजगी जागेत विशिष्ट कारणासाठी प्रवेशास मोकळिक असणारा रस्ता. –**works** तोडजोड कामे; आवश्यक म्हणून घेतल्या जाणाऱ्या जमिनीचा मोबदला व नुकसान भरपाई म्हणून कायद्याप्रमाणे करावी लागणारी (रस्ता, रहदारी, पाणी, कुंपण, गटार वगैरे सारखी) कामे.
**Accordance** संवेधन.
**Accordion door** विमानगृहातील घडीचा सरक दरवाजा.
**Accouplement** लाकडी ताण-आधार.
**Accretion of levels** उदाय-उन्नति, तळवाढ, पाणसळ-उचल.
**Accumulator** (विद्युच्छक्ति) संचायक. –**cell, Secondary cell, Storage cell** संचायक-साठवणी विजेरी, प्रायुविजेरी, परायु वीजघट.
**Accuracy** अचूकपणा, परिच्छिन्नता, कांटेकोरपणा, मानशुद्धपणा.
**Acerous, Acerose, Acicular** सूच्याकार, अण-कुचीदार, शलाकाकार, सूच्यग्र.
**Acetal** अशीतल.
**Acetaldehyde** दारिलप्रायोज्जिल, अशीताह्ल.
**Acetate** दार्वित, अशीतिक (लवण).
**Acetic acid** दार्वाम्ल, अशीतिकाम्ल. –**amide** दार्वमिद. –**fermentation** आम्लविपाक.
**Acetum** सिरका.
**Acetylene** नीरंग तीव्रज्वालाग्राही गॅस, दारिलीन, द्विका-यीन. **Acetyle urea** दारिल मौत्र. **Acetylidene** दारिलिडिन.
**Achchaday** (स्तूपाचे) आवेष्टन. पहा Envelope.

**Achromatic** निर्वर्ण, अवर्णक, बिनरंगाचा, नीरंग. द्रवपदार्थाचा रंग न शोषणारा. पृथक्करण झाल्याशिवाय जीमधून प्रकाशकिरणें जातात अशी वक्रीभवनरहित निर्वक्रीभवक (कांच). **–lens** नीरंगयव, तथ्यवर्णदर्शक. **–prism** नीरंग त्रिकोणयव. **–telescope** तथ्यवर्णदर्शक-दूरदर्शक यंत्र (दुर्बिण). **Achromatism** अवर्णकता, नीरंगता, नीरंगत्व. जसे **–of lens** यवाचें नीरंगत्व. **Achromatize** नीरंगत्व आणणे.

**Acicular** सूच्याकार.

**Acid** अम्ल, आम्ल, आंबट, आसिद, तेजाब. **–battery** आम्लविजेरी. **–igneous rock** अम्ल बहुत असलेले अग्निजन्य खडक. **–proof** अम्लजित्, अम्लाचा परिणाम न होऊ देणारा, आम्लाप्रभावित. **Acidic** आम्लयुक्त आम्ल, आम्लधर्मी. **Acidity, Acidness** अम्लत्व, अम्लता, अम्लभाव, आंबटपणा. **Acidified** अम्लयुक्त. **Acidify** आसिद करणे, तेजाब बनविणे, आंबविणे, आम्लयुक्त करणे. **Acidifiable** आसिद करण्याजोगा. **Acidification** आसिद करणे, अम्लीकरण, अम्लीभवन. **Acidimeter** अम्लमापक, अम्लपरीक्षक. **Acidimetry** अम्लमापन विद्या, अम्लमिति, अम्लमापन विचार. **Acidophil** अम्लाद. **Acidulous** आंबटसर, आंबुस, ईषदाम्ल. **Acidulousness** आंबुसपणा, आंबसरपणा, ईषदाम्लता. **Acidulate** अम्लयुक्त करणे. **Acidulated** अम्लित, आंबसर केलेला, अम्लयुक्त.

**Acme** कळस, शिखर, सीमा.

**Acnode** असंभाव्य संपात.

**Acoustic, Acoustical** श्रवणविषयक, ध्वनिशास्त्रासंबंधी, ध्वनिशास्त्रीय, ध्वानिक. **Acoustics** ध्वनिशास्त्र, नादविद्या, ध्वनिविज्ञान. **Acoustician** ध्वनिशास्त्रवेत्ता. **Acoustically** ध्वनिशास्त्रानुरूप.

**Acre** ०·४०४७ हेक्टेअर, ४८४० चौ. वार किंवा ४३,५६० चौ. फूट म्हणजे एक एकर (एक गुंठा = ११ वार × ११ वार = १२१ चौ. वार = ३३ फूट × ३३ फूट = १०८९ चौ. फूट). म्हणून ४० गुंठे = एकर. **Acre-foot** ४३,५६० चौ. फूट × १ फूट = ४३,५६० घनफूट म्हणजे एक एकर क्षेत्रांत एक फूटभर पाणी. **Acre-inch** ४३,५६० × १४४ × १ = ६२७२६४० घनइंच किंवा एक एकर क्षेत्रात एक इंचभर पाणी. **Acreage** क्षेत्राचे एकरामध्ये माप, एकंदर झालेले एकर, एकरमाप.

**Acrid** कडू, उग्र, झोंबणारा.

**Acroline** तीव्र-घ्राणिन. **Acrylic acid** तीव्र घ्राणाम्ल.

**Acropolis** प्राचीन ग्रीक शहराचा सर्वात उंच भाग–किल्ला-अंतर्दुर्ग ; अथेन्सचा किल्ला.

**Across stream** अवस्रोत (अव = काटकोनात), तीरोतीर. **Acroterium** (*pl.* **Acroteria**) शिल्प वास्तूच्या दर्शनी भागातील तिकोनी भिंतींच्या माथ्यावर किंवा टोकांवर बसविलेले पुतळे किंवा नक्षीकाम.

**Act** ची क्रिया होणे.

**Actinism** सूर्यकिरणांचा रसायन कार्योत्पादक धर्म [हा धर्म केवळ रक्तनीळ (Violet) व त्या शेजारील पुढील किरणांचा आहे], रासायनिक विकारता, किरण-क्रियाशीलता. **Actinic rays** विकारक किरणे, जंबुलातीत किरणे. **Actinolite** (ॲक्टिनोलाइट) रासायनिक-क्रियाशील. **Actinology** किरण विकारत्वशास्त्र, सूर्यकिरणशास्त्र. **Actinometer** किरण-विकारत्वमापक, किरणतीव्रतामापक.

**Action** परिणाम, क्रिया. **– Reaction** आघात-प्रत्याघात, क्रिया-प्रतिक्रिया.

**Activated sludge** प्रभावित-प्राणवायुयुक्त-प्रेरित कर्दम-सांका, हवाविष्ट पंकल. **Activation** प्रभावन. **Activation energy** उत्तेजक शक्ति. **Active** कारक, सक्रिय, क्रियाशील.

**Acute angle** लघु कोन, न्यून कोण. **Acute-angled triangle** लघुकोन त्रिकोण. **Acuteness** लघुत्व.

**Acyclic** एक वृत्तीय, अचक्रिक, अचक्रीय, हारहीन,

**Ad-absurdum proof** अपार्थ सिद्धता-सिध्दि.

**Adamant** वज्र, अतिकठिण, वज्रासारखा पदार्थ, हिरा, लोहचुंबक. **Adamantine, Adamantean** अतिकठिण, वज्रप्राय. **Adamantine lustre** रत्नप्रभा.

**Adam's bridge** रामसेतु, सेतुबंध (रामसेतूला रामसेतु न म्हणता ख्रिस्तीलोक "Adam's bridge" म्हणतात). **Adam's formula** रस्त्यासाठी सलोह काँक्रीटच्या लादीची जाडी काढण्याचे 'ॲडॅम-सूत्र'.

**Adapted** मोजण्यायोग्य. **Adapter** संयोजक, उपायोजक. **Adaptor** अनुकूलित्र, उपायोजक, अनुसंधानी. **Adaptability** प्रतियोगक्षमता, अनुकूलनीयता. **Adaptation** अनुसंधान, अनुयोजन.

**Add** बेरीज करणे, मिळविणे, योगकरणे. **Addendum** योज्य, अनुबंध. **Adder** संख्यांची बेरीज करणारे यंत्र. **Addition** बेरीज, संकलन, योग. **Compound addition** विविध बेरीज. **Cross-proof in addition** आड आंखताळा. **Successive subtraction-proof in 'a'** सारोळा (करणे-उतरणे). **Additions alterations** पुस्तीजोड, फेरफार. **Addition and subtraction** खांजणी-भांजणी. **Additive constant** वाढीचा आप्तांक (दुर्बिणीतून वेध घेऊन दूरच्या लक्ष्याचे अंतर काढण्याच्या पद्धतीत वेधांकांच्या फरकास गुणक आप्तांकाने गुणून येणाऱ्या अंतरात मिळविण्याचा).

**Addice** वाकस, तासणी, वसुला, वसुली, तक्षणी.

**Addorsed (back to back)** पाठीस पाठ.

**Adhesion** चिकटणे, संसक्ति, संसक्त्याकर्षण, विकर्षण, विषमकणाकर्षण, परासंग. **Adhesive** आसंजक, अभिलागी. **Adhesive force** दोन संलग्न पृष्ठांमधील घर्षण-संसक्ति.

**Adiabatic elasticity** रुद्धोष्म-असंक्रम स्वाग्रह. **–expansion** असंक्रम विस्तार, उष्णावरोधक विस्तार.

**Adiactinic** रक्तनीळ (Violet) रसायन कार्यकारी प्रकाश किरणे ज्यातून जात नाहीत असा, रक्तनील किरणा-विच्छेद्य.

**Ad infinitum** यावदनंत, अनंतापर्यंत.

**Adipic acid** आयानाम्ल, मेदिकाम्ल.

**Adit** आरोक, गुहामार्ग, खाणीत जाण्याचा अगर तीतून पाणी व अशोधित धातु बाहेर काढण्याचा मार्ग, खाणीत जाण्याची परवानगी.

**Adjacent** पार्श्वस्थ, संलग्न, समीप, जवळचे; जसे **–angles** संलग्न कोन, समीप कोन. **–sides** शाखाद्वय.

**Adjective colours** स्थापक रंग.

**Adjugate determinant** सहखंडज सारणिक, निर्धारक, कनिष्ठफल, सारिणिक.

**Adjustable** वश्य, विधेय, स्थित्यंतरक्षम, कळसूत्री. **–plane** कळसूत्री रंधा. **–proportionate module (A.P.M.)** विधेय यथामान मित्रिमा (वि. य. मित्रिमा), वि. य. मि. **–set square.** पहा Clinograph. **–spanner** समयोजक पाना. **–(open end) wrench** विशिष्ट प्रकारची पकड. **Adjust** अनुयोजना करणे. **Adjustment** समंजन, व्यवस्थापन.

**Adjutage, Ajutage** पाणी सोडणारी नळी किंवा नळीचे तोंड.

**Admeasure** मापणे, क्षेत्र मोजणे. **Admeasurement** क्षेत्रफळ, पैमाइश, अधिमापन.

**Administration building-block** कार्यालय, व्यवस्थालय.

-कच्ची-उन्हात वाळलेली वीट. **Adobe-house** कच्चे वीटघर.

Ādobe-house : कच्चे वीटघर

**Adsorption** पृष्ठ शोषण.

**Adytum** (*pl.* **Adyta**) गुप्तस्थळ, गर्भगृह, देवगाभार, एकांत खोली.

**Adze, Addice** वाकस, वांकस, तासणी (लहान असेल तर चोरशी), तक्षणी, वसुला, वसुली. **Worker with an adze** तासकामी-ऱ्या. **Work done with an adze** तासकाम, तास. **Cut with an adze** तासीव, ताशीव.

Adze : वांकस

**Aerated** फेनिल, वातित (पेय).

**Aerial,** हवाईतार, आकाश-शलाका, जोडतार, बाहुक, (Y बाहुकासाठी ही खूण वापरतात), आकाशीय, आकाशक. **–rope way** (मिनारांवर किंवा अन्य तन्हेने टांगलेल्या तार रज्जूंच्या आधाराने चालणाऱ्या वाहनातून वहातूक करण्यासाठी केलेला) 'आकाश रज्जुमार्ग'. **–survey.** पहा survey. **Aerie, Aery, Eyrie, Eyry** उच्चस्थानी बांधलेले रहाण्याचे ठिकाण.

**Aerobic** सानिक.

**Aerocrete** सच्छिद्र कंक्रीट; रासायनिक मिश्रणांनी गॅस किंवा हवेचे बुडबुडे निर्माण करून सच्छिद्र कॉंक्रीटचे काही प्रकार तयार करतात. अशा कॉंक्रीटचे वजन घ. फुटास ३५ ते ११० पौंड किंवा घ. मी. स ५६० ते १,७६० किलोग्रामपर्यंत इतके असते. गॅस कॉं. व फोम कॉं. अशापैकीच प्रकार असून ते चांगले विद्युद्विरोधकहि असतात.

**Aerodrome, Airdrome (Land or Water)** विमाने उतरण्याचे ठिकाण, विमानतळ, विमाने उतरण्या व सुटण्यासाठी जमिनीच्या किंवा पाण्याच्या विवक्षित क्षेत्रात यंत्रालये व इतर संबंधित इमारतींसह केलेला तळ. **Aerodynamics** वायुगतिशास्त्र, वायुगतियामिक. **Aerography** वायु-वर्णन, वातावरण वर्णनशास्त्र. **Aerolite, Aerolith** उल्का, आकाशातून पडलेला दगड. **Aerolithology** उल्काशास्त्र. **Aerology, Aerognosy** समीरविद्या, वायुविद्या, वायुशास्त्र, वायुगुणशास्त्र. **Aerologist** वायुशास्त्रवेत्ता. **Aerometer** हवा किंवा इतर वायूंचे घनत्व किंवा वजन मोजण्याचे यंत्र, वायुघनत्वमापक. **Aerometry (now called) Pneumatics** वायुमिति, वायुमापनविद्या. **Aeronaut** वैमानिक. **Aeronautics** आकाशयान-विद्या, विमानशास्त्र, वैमानिकी, विमान-विज्ञान. **Aeronautic, A'nautical** विमानशास्त्रविषयक. **Aeroplane Air plane** आकाशयान, हवाई जहाज, विमान. **Aerostat** विमान, वैमानिक, तिर विमान. **Aerostatics** विमानशास्त्र, वायुस्थितिशास्त्र. **Aerostation** आकाशगमन-आकाशसंचार कला.

Aeroplane : हवाई जहाज

**Aesthetics** सृष्टिसौंदर्यशास्त्र, सौंदर्यविज्ञानशास्त्र. **Aesthetic 'A'cal** सौंदर्यविज्ञानशास्त्राचा-शास्त्राविषयी. **Aesthete** सौंदर्यविज्ञानशास्त्रज्ञ. **Aestheticism** सौंदर्यविज्ञानशास्त्राची तत्वे. **Aestheticize** मार्मिकाच्या रुचीस उतरेल असे करणे.

**Aesthiops mineral** कज्जली (**sulphurate of mercury**).

**Aether, Ether** ईथर, संवह, परम आकाश, पंचमहाभूतातील

पहिले तत्त्व. उष्म, प्रकाश, विद्युत् यांच्या लाटा ज्याच्यामधून जाऊ शकतात ते सर्वव्यापी शक्त्यधिष्ठान. (Chem.) इंधक, वाऱ्याप्रमाणे उडून जाणारा एक प्रकारचा तेजाब. (Physics) आष्टू, तेजोवाहक आकाश-तत्त्व. **Aethrioscope** वातावरणोष्णता स्थित्यंतरमापक (यंत्र), किरणविसर्जनदर्शक (यंत्र).

**Afer** नैऋत्य दिशेचा वारा.

**Affected or adfected quadratic equation** संयुक्त वर्ग समीकरण.

**Affinity** स्नेहाकर्षण, रासायनिक आकर्षण.

**Affix** आस्थ.

**Affluent** मोठ्या नदीला मिळणारी लहान नदी किंवा नाला, ओढा, ओहोळ, उपनदी.

**Afflux** उधळण, उद्धति, फूग, फुगोटी, उभार, फुगवटा, तुंबा, तुंबारा, लोंढा, प्रवाह. **Affluxed high flood levels** सीमापूर फुगोटीची पातळी, उद्धत प्रपूरोदाय.

**Afore** गलबताच्या पुढील भागात.

**A fortiori** अधिकाधिक (निष्कर्ष), सुतरां, अतितरांभावी.

**Aft** वरामाकडे, गलबताच्या मागचे बाजूस.

**After bay** अपगा, पदधि, निर्मितिचक्राच्या बाहेरवाटेतले टांके, पायथेतळे.

**After crop** (एका वर्षांतील त्याच जमिनीचे) दुसरे–दुसोटचाचे पीक, पश्चिम धान्य, वाऱ्यांगणे, वांयगणी शेती.

**After deck** मागचा दाटा-तक्तपोशी.

**Agate** एकप्रकारचा गुळगुळीत तांबुस दगड, अकीक, कोणी याला गोमेद-गोमेदक असेही म्हणतात (गुजराथेत खंबात येथे हा सांपडतो).

**Age, Period** युग. **Iron age** लोहयुग. **Stone age** पाषाण युग. **Age hardening** कालिक कठोरता, मिश्र-धातूंचा संकर झाल्यावर काही बाह्य कारण नसूनही केवळ वातावरणीय उष्णतामानात ते काही तासात किंवा दिवसात कठीण बनतात. हा स्थितिबदल होत असतानाच त्यांच्या बळकटपणात वाढ व तंतुभवनशीलतेत काहीशी कमतरता निर्माण होते.

**Agent** क्रिया घडवून आणणारा, कारक.

**Agglomerate** ज्वालाश्मचय, ज्वालामुखी पर्वतातून बाहेर पडलेल्या अणीदार वस्तूंचा जमाव. अणीदार तुकड्यांचा अग्निजन्य खडक.

**Aggregate** कच, वाळूचे खडे, खंगर, विटांचे तुकडे, कोक ब्रीझ, (कॉन्क्रीटची घटक द्रव्ये ; सिमेंट व पाणी याखेरीज सर्व). आग्रावित.

**Agonic** शून्यदिक्पाती, कोन न करणारा, कोनशून्य. **–line** समकोण-बांकशून्य रेषा, अकोनरेषा (ज्या ज्या ठिकाणी लोहचुंबक सूची बरोबर उत्तर दिशा दाखविते त्या त्या मधून जाणारी पृथ्वीच्या पाठीवरील कल्पितरेषा, अशी पूर्व व पश्चिम गोलार्धात एकेक आहे.

**Agora** सार्वजनिक न्यायस्थान-न्यायांगण-न्यायमंदिर, सार्वजनिक बैठकीची खुली जागा, बाजार, सभाचौक.

**Agreement area** परिगृहित क्षेत्र. **Agreement** संमतिपत्रक, कबुलायत.

**Agriculture** कृषिविज्ञान.

**Air** अनिल, हवा, वारा, वात, वायु. **–bath** हवेने पाणी ताप विण्याची भट्टी. **–brake** हवेच्या दाबाने लागणारा रेल्वेतील ब्रेक. **–brick** खोल्यांतून हवा खेळण्यासाठी हवेच्या नळांच्या तोंडाशी भिंतीत बसविलेल्या बिडाच्या किंवा चिनी मातीच्या सच्छिद्र विटा. **–built** भक्कम पाया नसलेले. **–chamber** वात-वायुकोष्ट. **–compression** वायुसंपीडन, वायुसंकोचन. **–compressor** वायुसंपीडक, वायुसंकोचनयंत्र. **–conditioned** वातानुकूलित, हवास्थापित. **–conditioning** वातानुकूलन, हवास्थापन, हवेचे सुखदायन, तपमान नियंत्रण, शीतकरण, (पाण्याने न निववित) थंड हवेच्या माऱ्याने उष्ण-पदार्थ निवविणे. **–craft carrier** विमानवाह युद्धनौका. **–cushion** वायूने फुगविलेली पिशवी. **–drain** पायातल्या भिंतीलगतची कोरडी जागा. **–dry** वातशुष्क, स्थानिक हवा-मानाइतपतच ओलसरपणा असणारे इमारती लाकूड. **–dried** हवेन शक्य तितकेच रापविले गेलेले लाकूड. **–ducts** वायु-नलिका, घरभर उष्मीकरण वारावण्यासाठी खेळविण्यास सोडाव्या लागणाऱ्या हवेच्या नळचा. **–engine** वायूने चालणारे यंत्र. **–entraining agents** हवा खेळविण्याची उपकरणे-साधने. **–field** हवाई-विमानतळ (यात विमाने ठेवण्याची व दुरुस्तीची किंवा मालाची ने-आण करण्याची सोय नसते). **–filter** हवा-वायु स्वच्छ करण्याचे यंत्र, हवागाळणी **–flow** वातप्रवाह. **–flue** हवामार्ग. **–gas** पेट्रोलियम-सारख्या पदार्थांची वाफ देऊन साध्या हवेतून बनविलेला ज्वाला-ग्राही व प्रकाशक गॅस. **–furnace** वायुभट्टी, फक्त हवेच्या जोराने चालणारी भट्टी. **–gun** वातनलिका, हवेची बंदूक. **–hole** वायु-छिद्र, धारे, गवाक्ष, झरोका-खा, झरूका-खा, खिडकी, जाळी, वातायन. **–hole of a water conduit** उच्छवास, उस्वास. **–inlets** हवेचे आंतर्मार्ग. **–jacket** पाण्यात तरंगता यावे म्हणून हवेने भरून तयार केलेले-फुगविलेले कुडते, उष्णताशोषक पाणीयुक्त पोकळी. **–less** खेळती हवा नसलेला, निर्वात. **–lift pump, air pump** वाताकर्षक पंप, बंब्या, वात निष्कासक यंत्र, वाय्वाकर्षक यंत्र, निर्वात पंप, एडपंप, एअरपंप. **–lock** पुलाच्या खांबांच्या पाण्याखालील जास्त हवादाबात काम करीत असता वापरण्यात येणाऱ्या कुसूलाच्या किंवा पोकळ नळकांड्याच्या माथ्यावर माणसांच्या व सामानाच्या नेआणीसाठी ठेवलेले प्रवेशद्वार, वायु-बंध. **–motor** पवनचक्की **–oven** हवेने ओला पदार्थ वाळविण्याची भट्टी. **–passage** वायुमार्ग, हवा नेणारी नलिका, साणे. **–pocket or bubble** हवाई गर्त, नळीतील प्रवाहाला अडथळा करणारा हवेचा बुडबुडा. **–port** (विमाने ठेवण्याची, वहातुकीची व दुरुस्तीची सोय व उतारूंची व मालाची ने-आण करण्याची सोय असलेला) विमानतळ. **–seasoning** ऊन-पाऊस न लागेल अशा पण मोकळ्या हवेत रापविणे. **–shaft, –sheet** खाणीत हवा जाण्याचा मार्ग, वायुमार्ग-प्रवाहक. **–ship** हवाई जहाज

**–space** हवेची पोकळी, हवामाव (श्वासोच्छ्वासास लागणारी हवा सामावणारे घनक्षेत्र). **–spaces** हवेकरिता ठेवलेल्या फटी. **–test** हवा कसोटी, निचरण नळंडयांची सर्व खुली तोंडे बंद करून सांईच्या जागेतून आत हवेचा दाब सोडल्यास भारमापकाने गळतीच्या जागा ताबडतोब कळतात. **–tight** हवाबंद, वायुरुद्ध, वाताभेद्य, वातागम्य, वायु-वात निरोधक-प्रतिबंधक, हवा न शिरण्याइतका घट्ट बांधलेला. **–valves** वातपिधान, वातनियंत्रक. **–vessel** वायु-पात्र, हवेची नळी. **–volcano** वायुस्फोटक. **–ways** वायुपथ-मार्ग. **Airy** वायूचा, वायुमय.

**Aisle** चर्चच्या सभामंडपातील प्रवेशद्वारापासूनच्या लांबट मध्यभागाच्या दोहोंबाजूंचे चष्मे-खण-पाखा.

**Ait** जुवे, बेट.

**Ajar** किलकिले अर्धे-उघडे (दार).

**Alabaster** सिलखडी, संगमरवरी दगडासारखा पांढरा दगड, अलॅबॅस्टर (खनिज).

**Albedo** प्रतिक्षेप, काशानुपात.

**Albite** (अलबाइट) फेल्सपार जातीच्या मिश्र धातूंचा शुभ्रदगड.

**Alchemy** किमया रसायन, धातुपरिवर्तन विद्या, रसायन शास्त्राचे मूळ नांव. **Alchemist** किमयागार. **Alcohol** सुषव, अल्कल, मद्यसार, कोहोल. **Alchoholisation** मद्यसारसंयोजन. **Alchoholometer** मद्यसारमापक.

**Alcove** भिंतीतील कमानदार कोनाडेवजा जागा (कपाट वगैरे ठेवण्यासाठी केलेली), मंडप, उद्यानकुंज, पर्णशाला, वाहिका.

**Aldehyde** प्रायोज्जिल, आहल.

**Aldrop bolt** अडसर.

**Alee** वाऱ्याच्या उलट बाजूस, अनुवात.

**Alfa rays** अल्फा किरण हे धनविद्युत्युक्त (ions) कणांचा प्रवाह असतो ; लोहचुंबकाच्या साहाय्याने त्यांना एका बाजूस खेचता येते.

**Algebra** बीजगणित, अक्षरगणित, अव्यक्तगणित, बीजगणिताचे पुस्तक. **Algebraic, Algebraical** बैज, बीजगणित-विषयक, बैजिक. **–curve** बीजीयवक्र, बीजवक्र, बीजपदव्याख्येयवक्र. **–equation** बीज-समीकरण, बीजदर्शन, बीजकीय दर्शन. **–expression** बीजवाक्य. **–function** बैजफल. **–geometry** बीजभूमिति. **–identity** बीजनित्यक, समानिका, नित्यसंबंध. **–number** बैजसंख्या. **–operation** बीजप्रक्रिया. **–representation** बीजनिदर्शन. **–term** बीजपद. **Know quantity in algebra** रूप. **Operation of working in algebra** अव्यक्तकार्य. **Unknown quantity or number in algebra** अव्यक्तराशि. **Equation of unknown quantity** अव्यक्त समीकरण. **Relation of unknown quantity to its coefficient** यावत्तावत्. **Algebraist** बीजगणिती, बीजगणितज्ञ, बीजगणितवेत्ता.

**Alidade** दृष्टिक्षेपक, दर्शरेखक.

(१) Alidade : दर्शरेखक

**Align** ओळीत घेणे आणणे, आंखणे, रचन करणे. **Alignment** जुळवणी, आंखणी, संरेखन, खुंट्या मारून हद्द मुक्रर करणे, लाईन, सूत्रण, सुसूत्रता, (**Proper spacing of Roads, Railways, etc.,** आसृति रेखासृति.)

**Alinda** सोपा, ओटी.

**Alineation** एकरेषा स्थिति.

**Aliquant** सशेषभाजक, जिने दुसऱ्या रकमेस भागिले असता शिल्लक रहाते ती (संख्या). **Aliquot** अशेषभाजक, निःशेषभाजक, जिने दुसऱ्या रकमेस भागिले असता शिल्लक रहात नाही ती (संख्या). **–part** मितांश.

**Alizarine** ॲलिझरीन नावाचा तांबडा रंग (कापसास तांबडा रंग देण्याकरिता याचाच उपयोग करतात), मंजिष्ठीन.

**Alkahest** सर्व धातूंचे किंवा वस्तूंचे पाणी करणारा पदार्थ, सर्वद्रावक.

**Alkali** अल्क, आल्कली, कल्याब, (दाहक) क्षार, आंबटपणा घालविणारा, क्षारक. **Fixed alkali** दृढ आल्कली. **Vegetable alkali** उभ्दिज आल्कली. **Volatile alkali** चपल आल्कली. **Alkali soils** आल्कलमाती, अल्कलमृदा. **Alkaline** आल्कलीयुक्त पदार्थ : उ. चुना, क्षारीय, आल्कलीधर्मी, अनाम्ल, अल्कलीन, अल्कधर्मी, आल्कल. **–battery** अल्कविजेरी. **–earths** पार्थिवक्षार, आल्कली. **Alkalify** कल्याब-आल्कीरूप करणे. **Alkaloid** आल्कल, आल्कलिकल्प, क्षारांच्या मुख्य तत्वा सारखा पदार्थ. आल्कलि धर्मक, आल्कलिसारखे. **Alkali metal** क्षार-अल्क-धातु. **Alkalimeter** क्षार आल्कलीमापक. **Alkalimetry** क्षार-आल्कलीमिति, अल्कमिति, आल्कलीमापनशास्त्र. **Alkyl** उत्कर्ष कार्बिल. **Allette** इमारतीचे पाखे, पर्डभित, चौकोनी खांब.

**Alley** बागेतील रस्ता-वाट, उपवनमार्ग, आराममार्ग, बागेतील पायवाट, (शहरातील) आळी, आळ, गल्ली बोळ, वीथि. **Row or alley in village** पाखाडी

**All-heart** साडरहित असे सर्वस्वी गोडे इमारती लांकूड

**Alligation** मिश्रगणित, सुवर्णगणित, एका जिनसाच्या निरनिराळ्या जातीचे निरनिराळे दर असता ते घेऊन त्यांच्या मिश्रणाचा अगर अनेक जिनसांच्या दरांच्या मिश्रणाचा एकंदरीचा दर काढणे.

**Alligatoring** रंगाच्या दर्शनी हातात दिसणारे रं फराटे.

**Alligator wrench** खाचे असलेले जबडे बसविलेली नळ वांकविण्याची व आंटे फिरविण्याची रिंच.
**All in tariff** सररहा, जकातीचा निरखनामा.
**Allotment** प्रभाजन, वाटणी.
**Allotrimorphic** अनेकरूपी : **Allotrope** दुसरे रूप. **Allotropism, Allotropy** अनेकरूपत्व, बहुरूपत्व, बहुरूपता. **Allotropic modification** रूपभेद.
**Allotter** क्रमनिर्धारक, क्रमनिर्धारित्र.
**Allowable bearing pressure** क्षम्य धारव प्रेरण.
**Alloy** मिश्रधातु, संकर, जोडधातु, हीण, उत्तम धातूत कमी दराची घातलेली धातु, हीण घालणे, हिणकर-हिणवट-हिणकस करणे. **Alloyed** हिणकट केलेला, हिणाचा.
**All-rowlock wall** कोडी आडव्या विटांचे दोन थर व कोडी बंदांचा एक थर याप्रमाणे एकांतराने लावलेल्या थरांच्या मांडणीची भिंत.
**Alluvial** पुळणीचा, ओंबाळणीचा, मळईचा, पुलिनमय, जलोढ, खळमळाचा. **–bank** पुलिन. **–cone** पुलिनिका, पुलिन शुंड, पुळण सोंड. **– depositions** मळई. **–fan** पुळणपंखा. **–land** पुळणदेश. **Alluvium, Alluvion** (*pl.* **Alluviums, Alluvia**) पुळण, ओंबाळ, समुद्राच्या किनाऱ्यावर किंवा नदीच्या तीरावर आतून येऊन साठलेला खळमळ, हा खळमळ सांठून तयार झालेली जमीन, गाळाची जमीन, मळी, होर, साय, मळकी गजरी, साका, जलोढक.
**Allyl** लशिल. **Allylene** लशिलीन.
**Alma-mater** ज्यात आपण शिकलो ते विश्वविद्यालय किंवा शाळा, विद्यापीठ (मायलेकरांच्या संबंधाप्रमाणे विद्यालय व विद्यार्थी यांचा संबंध मानून हा शद्ब विश्वविद्यालयास लावतात).
**Almirrah** कपाट, पेटी, अलमीरा.
**Almonry** दानशाला, दानगृह, धर्मपोई, अन्नसत्र, सत्र.
**Alnico** अल्युमिनिअम, निकेल, कोबाल्ट, कार्बन, मँगनीज, सिलिकोन व लोखंड यांच्यापासून तयार झालेला मिश्र धातु. यापासून तयार केलेल्या लोहचुंबकाने त्याच्या वजनाच्या पन्नासपट वजन उचलता येते.
**Aloe** घायाळ, घायपात, कोरफड. **–'s wood** अगर, अगरू.
**Alpha particle** आल्फा कण, अ अल्पकण, हेलुक.
**Altar** वेदि, स्थंडिल, यज्ञवेदी, सुक्या गोदीतील जहाजांना दिलेले धिरे ज्यावर टेकतात त्या पायऱ्या. **–table** ख्रिस्ति देवळातील प्रभुभोजनाचे मेज. **–tomb** स्थंडिलासारखे छत असलेले थडगे.
**Altazimuth** उद्दिगंशक, उन्नति दिगंशमापक यंत्र (थिओडोलाईटसारखेच पण आकाराने मोठे व काटेकोर असे यंत्र).
**Alteration** अयन, अग्रायण, परिवर्तन.
**Alternate** एकांतर, एकसोडून एक, एकांतरित्. **–angles** व्युत्क्रमकोन. **–segment (part of a line)** व्युत्क्रम खण्ड, एकांतर खंड. **–segment (in a circle)** तदितर (वृत्त) खंड. **Alternately** विपर्यायाने, विनिमयाने, एकांतरतः. **Alternating current (A. C.)** प्रत्यावर्ती-यातायातिक-जातायेता वहाळ (वहा), लहरी प्रवाह, उलट-सुलट वाहाणारा प्रवाह. **Alternation** जा-ये, अयन, अग्रायण, यातायात, अन्यतरा, परस्पर पालट, परस्परानुगमन, परस्परानुवर्तन, एकांतरण, परिवर्तन.
**Alternando** एकांतर प्रक्रिया-अनुपात-भावन.
**Alternato** प्रत्यावर्तक. **Alternator** विपर्यायक, प्रत्यावर्तक, यातायाती.
**Altimeter** उच्चत्वमापक, उंची मोजण्याचे यंत्र. **Altimetry** उच्चत्वमापनमिति, उंची मोजण्याची विद्या.
**Altitude** नति, नत्यंश, उच्चांश. (त्रिकोणाचे) शिरोलंब, समुद्रसपाटी (**M. S. Level**) पासूनची उंची, उंची, उन्मिति, उच्चत्व, उन्नतांश (क्षितिज-पातळीशी होणारा कोन), लंबोन्नति. **Co-altitude, zenith distance** उपनति, उप-नत्यंश. **Meridian altitude** उन्नति, याम्योत्तर उन्नतांश. **Meridian zenith distance** उप-उन्नति. **To take the altitude** उंची घेणे-काढणे-मोजणे.
**Altometer** थिओडोलाईटचे दुसरे नाव.
**Alum** तुवरी, तुरटी, फटकी, स्फटी, फिटकीर, तुरटीच्या पाण्यात भिजविणे. **–stone** खनिज तुरटी. **–ammonia** अमोनियाची तुरटी. **Aluminate** स्फटिक. **Aluminite** स्फटायित. **Aluminous, Alumish** फटकीचा, तुरटीचा, स्फटीमय.
**Aluminium** (ॲल्युमिनिअम) स्फट, स्फटघातु, एक प्रकारची पांढरी व हलकी कथलासारखी धातु, अश्म (धातु). घ. फू. वजन १६० पौंड. **Alumino-siliceous clays** अश्मसिकतोपल मृत्तिका.
**A. M.** मध्याह्नसमयात्पूर्वम्, अ. म. (अग्रमध्याह्न). पहा Ante Meridian.
**Amalgam** संरस, पारदमिश्रण, पारदमिश्र धातु, मिश्रण सपारद (पारद=पारा), पारदमेल.
**Amalaka, Amalasila Amalsari** शिखरावरील नक्षीदार कलिंगडाकृति.
**Amber** अंबर, तृणस्फटिक, तृणमणि, तृणग्राही, तैलस्फटिक, केरबा, जमिनीत सांपडणारा पिवळसर रंगाचा सुगंधी पदार्थ, अंभर.
**Ambiguous case** संदिग्ध प्रकार, दोन त्रिकोणांची (**of two triangles**) संशयावस्था-अनिर्णित स्थिति.
**Amblygon** विशाल कोनाची आकृति.
**Ambo** उच्च उपदेशपीठ-व्याख्यानपीठ, उच्च उपदेशकासन.
**Ambry, Aumbry** चर्चमधील उपकरणी ठेवण्याचे फडताळ.
**Ambulance** रुग्णवाहिनी, इस्पितळी गाडी.
**Ambulator** मार्गावरील अंतर मोजण्याचे यंत्र,

पथमापक. **Ambulatory** प्रदक्षिणापथ.

**American bond** या तऱ्हेच्या मांडणीत पाचवा किंवा सहावा सबंध थर बंदांचा असतो व बाकीचे थर आडव्यांचे असतात ; जलद बांधकामास ही मांडणी सोयीची आहे.

**American caisson.** पहा Caisson.

**American standard wire gauge.** पहा Brown and Sharpe wire gauge.

**Amethyst** कहरूबा (केरबा), नीलमणि स्फटिक, रक्तनील किंवा जांभळ्या रंगाचा गारेचा एक प्रकार ; याचे जवाहिरी दागिने करण्याकडे उपयोग होतो.

**Amide** अमिद. **Amidogroup-amyl** अमोद्य-अमिल.

**Amine** अमिन. **Amino** अमोदिन.

**Amman (Pavilion attached to temple for ceremonial reception of amman or goddess)** अम्मान, उत्सव मंडप.

**Ammeter, Ampere meter** ओघमापक, विद्युत्प्रवाह्-मापक, ॲम्पीअर मीटर.

**Ammite** वालुमिश्रित प्रस्तर विशेष, एक प्रकारचा रेताड दगड.

**Ammonia** अमोद, मूत्रवायु, अमोनिया. **Ammonite** अमोनाईट (प्राणी), शालिग्राम.

**Ammonium** अमोदीय. **Ammonium chloride** नवसागर.

**Amorphous** अरवकी, अनिबन्धी, अस्फटिक, बिनरवाळ, अनियताकृति, अनाकार, अमणिभ.

**Amount** रास, राशि (मुद्दल + व्याज).

**Amperage** ओघमान.

**Ampere** ओघ, ॲम्पिअरने ठरवलेले विद्युद्वेगाचे प्रमाण, विद्युत्प्रवाहशक्तिप्रमाण. **–hour** ओघतास. **–meter** ओघमापक, विद्युद्वेगमापक यंत्र, आंपीर-मापक. **–turns** वहाळवेढे, ओघवेढे, ओघवलय.

**Amphibious tank** जमिनीवरून व पाण्यातून चालणारा रणगाडा.

**Amphibole** अंफीबोल.

**Amphi-prostyle** दोन्ही बाजूस पडव्या असलेले देऊळ.

**Amphitheatre** सभोवती चढती प्रेक्षकासने असलेली गोल किंवा दीर्घ गोलाकार रंगशाला, बदामी अर्धचंद्राकार नाटकगृह किंवा सभागृह, उभयासन नाटक-शाला, बदामी डौलाचा तालीमखाना, कुस्त्या वगैरे खेळण्याची रंगभूमी, रोमन-अखाडा, डोंगरातील अंडाकार दरी.

**Amplification** विवर्धन, विस्तार, विस्तारितत्व. **–factor** वर्धमान गुणक. **–fier** प्रवर्धक, विवर्धक.

**Amplitude** शर, उन्मेष, परमप्रसर, संप्रसर, कंपनविस्तार, आंदोलन-विस्तार, विस्तीर्णता, त्रिज्या, कोणांक, आयाम. **–modulation** मर्यादा-मुद्रण, आयाम-अधिमिश्रण.

**Amygdaloid** बदामाकार, बदामाकृति. **Amygdaloidal** बदामी.

**An** अ, अन्. जसे **Anhydride** = अनार्द्र.

**Anabolism** निर्माणजीवनक्रिया, चय, उपचय.

**Analogy** सादृश्य. **Analogous** समरूप.

**Analysis** छाननी, परिच्छेद, विश्लेषण, पृथक्करण (विलोम), मूल-तत्त्वशोधन, उपोद्घात. (in calculus) संगतिकरण. **The method of analysis** पृथक्करणपद्धति. **Analysis and synthesis** पृथक्करण व संयोजन. **Analytics** पृथक्करणविद्या मूलतत्त्वशोधनविद्या. **Analytical geometry of conics** बीजभूमिति, संगत भूमिति. **Analytical process** परिच्छेदीय-पृथक्करणप्रक्रिया. **Anallatic telescope** विशिष्ट बिंदूचे दुर्बिणीपासूनचे अंतर काढण्याच्या कामी वापरण्याची दुर्बिण ; हीत वाढीचा आप्तांक पूज्य असतो.

**Anatomical museum** शारीरपदार्थ संग्रहालय. **Anatomy** शरीरशास्त्र.

**Anardha-paga.** Projected surface adjacent to the surface at the angle of a building.

**Anærobic** अनानिल, अनौर्व. **–bacteria** अनौर्वजंतु (उर्व म्हणजे **oxygen**), प्राणवायूशिवाय जगणारे.

**Anchor** नांगर, लंगर, लांगल. **–arms** नांगराचे दात, लांगल्यबाहु. **–bar** लांगल दण्ड. **–bolt** लोहस्तंभ किंवा यंत्रांच्या बैठकी जमिनीतल्या पायाशी जोडणारे नांगर बोल्ट, पायातील बोल्ट. **–hold** नांगराचा दांडा. **–ice** भूमिस्थ-तळ बर्फ, बैठे बर्फ. **–lights.** पहा Riding lights. **–log** ताणदोरास आधार देणारा लाकूड, काँक्रीट किंवा धातु यांचा जमिनीत गाडलेला खुंट. **–tower.** पहा Derrick tower gantry. **Small anchor** लोइली, लोली. **Anchoring ground** नांगरवाडा. **Anchorage** खुटवा, गलबत नांगरल्याबद्दल द्यावा लागणारा कर, लांगल्य. **Dropping of anchor for a season in some still water** बंदर-ओखा करणे.

**Ancient lights** कायदेशीर हरकत होण्यापूर्वी एकोणीस वर्षे व एक दिवस ज्या खिडक्या वापरात असून त्यावाटे उजेड घेतल्याची वहिवाट सिद्ध झाली असली तर अशा खिडक्यांना त्यावाटे पुरेसा उजेड घेण्यासाठी त्या उघडच्या ठेवण्याचा कायमचा हक्क प्राप्त होतो.

**Ancon** (*pl.* **Ancones**) कंगणीला किंवा गलथ्याला आधारासाठी प्रवेशद्वाराच्या दोहोबाजूस बांधकामात ठेवलेले नक्षीदार घोडे-झुकावाचे दगड. भारी चिरे उचलून बांधकामात लागतील त्या जागेवर ठेवण्यास सोईचे व्हावे म्हणून चिऱ्यास ठेवलेली अडकणे.

**Andesite** आंडेसाईट.

**Anemograph, Anemometer** वायुवेगमापक, वायूची दिशा, शक्ति किंवा वेग मोजण्याचे व नोंद करण्याचे यंत्र, बायलरच्या चुल्यातून व धुराडच्यातू

जाणाऱ्या हवेच्या प्रवाहाची गति मोजण्याचे यंत्र.

**Aneroid barometer** निर्द्रव भारमापक, अप्रवाही भारमापक. **Aneroid measure (e. g. degrees)** वलितांश [ (चलित/अरित्र) = वलित ] वलिताचे अरीयमान, वलित, कोनक.

**Anghri** तोकडा-ठेंगणा खांब.

**Angle** वलित, कोन, कोना, कोण, कोपरा, अस्र (सपाट कोन). **–of aberration** अपेरण-विपथन कोन. **–of advance** वृद्धिकोन. **–at the base** पादकोन, तलस्थ-कोन, पायाकडचा कोन. **–at the centre** मध्यकोन, केंद्रकोण, नाभिकोन. **–at the circumference** परिध-परिधस्थकोन, पालिकोन. **–of declination** दिक्पात कोन, विचलन कोन. **–of depression –of dip** नतांश, अवनमनकोन, नतकोन. **–of descent** अवतरण कोन, अधःकोन. **–of deviation** अपगमकोन, विचलन कोन. **–of draught** ओढणकोन. **–of elevation** उन्नतकोन, उन्नतांशकोन. **–of emergence** निर्गमकोन. **–at the eye** अक्षकोन. **–(s)at the focus** नाभिस्तकोन. **–of friction** घर्षणकोन, घर्षास्र. **–of incidence** पतनकोन, आपतनकोन, आगमकोन, मूलकिरणकोन. **–of inclination** नतिकोन, संगमकोन, विप्रतिपातरूपीकोन. **–of lead** अग्रांश. **–of log** पश्चांश. **–of position** स्थानीयकोन. **–of reflection** वलनकोन, परावर्तनकोन. **–of refraction** वक्रीभवनकोन, वर्तनकोन. **–of repose** घर्षणकोन, विश्रामकोण, स्थितास्र. **of rupture** भंगकोन, भंगास्र. **–of screw** मळसूत्राचा कोन. **–of thread** आटचाचा कोन. **–at the vertex** शिरःकोण. **–of the vertical** ऊर्ध्वाधरीय कोन. **Acute angle** लघुकोन, न्यूनकोन. **Adjacent angle** संलग्न कोन, समीप कोन. **Alternate angle** व्युत्क्रमकोन, एकांतर कोन. **Aperture Angle** द्वारक कोण. **Base angle** आधार कोण. **Brewster's angle.** पहा Polarising angle. **Common angle** सामान्य कोन, उभयनिष्ठकोन, सार्वकोन. **Complementary angle** कोटिकोन, पूरक कोन. **Contiguous angle** समीप कोन. **Corresponding angle** अनुरूपकोन, अनुबद्ध कोन, संगत कोण. **Critical angle** संधिकोन, अवधिकोन, क्रांतिक कोन, **Dihedral angle** द्वितल कोण. **Dip angle** नमन कोण, नति. **Direct angle** दक्षिणावर्त दिगंश. **External angle, Exterior angle** बाह्यकोन, बहिष्कोण. **Horary angle** नतकालकोन. **Hour angle** होरा कोन. **Included angle** अंतर्गत कोन. **Internal angle, Interior angle** अंतःकोन. **Interior opposite angle** अंतःसंमुख कोन. अंतराभिमुख कोन. **Oblique angle** विषम कोण. **Obtuse angle** विशाल कोन, अधिक कोन. **Opposite angle** अभिमुख कोन, संमुख कोन. **Parallactic angle** दिग्भेद कोन. **Plane angle** प्रतल-समतल कोन. **Polarising angle** ध्रुवण कोण. **Position angle** स्थिति कोण. **Recti-linial angle** सरलरेषा कोन. **Re-entrant angle, Reflex angle** अंतःप्रवेशक कोन, प्रविशाल कोन. बृहत्कोन. **Related angle** संबद्ध कोन. **Right angle** काटकोन, समकोन, जात्यकोन, लंबकोन. **Solid angle** घनकोन. **Spherical angle** चापीयकोन, गोलीय कोन. **Straight angle** सरल कोन, ऋजु कोन. **Supplementary angle** संपूरक-प्रपूरक कोन. **Subtended angle** संमुख कोण. **Vertical angle** शिरःकोण, शिरस्थ कोण, शीर्षकोण, ऊर्ध्वकोन. **Zenithal angle** खमध्य-शिरोबिंदु कोन. **Vertically opposite angle** अभिसंमुख कोन, शीर्षाभिमुख कोन. **Visual angle** दृष्टी कोन, दर्शन कोन. **Angle bricks.** पहा Purpose-made brick. **Angle board** अंश फळी. **Angle dozer.** पहा Bull dozer. **Angle gauge** इष्ट कोनांची वेगवेगळी पाने असलेले हे गेज प्रोट्रॅक्टरपेक्षा जलद आणि नेहमीच्या उपयोगास जास्त सोईचे आहे. **–iron** कोनलोह, इंगलण, काटकोनाच्या आकृतीची लोखंडी कांब, कोणप, वज्रकोणप, कोणायत. **–iron shears** काटकोनाच्या आकृतीची लोखंड कापण्याची कातर. **–joints** कोनसांधे. **–rafter, ridge.** पहा Hip rafter. **–stone.** पहा Quoin. **Angled, angular** सकोन, कोनाचा, कोनदार, कोणेदार, कोनाकृति, कोनीय, कोपरेदार, अंशात्मक. **–diameter** वलितात्मक-कोनव्यास. **–distance** कोनीय-कोनात्मक अंतर, वलितांतर, दिगंतर. **–instrument** कोनमापक यंत्र. **–magnitude** कोनात्मकमान. **–measurement** कोनमापन. **–motion or velocity** परिवेग, वर्तुलगति, कोनगति, कोनीयगति, वर्तुळात फिरणाऱ्या पदार्थाची गति. **–perspective drawing.** पहा Two point drawing. **–points** कोपरे, कोनबिंदु, कोनीय बिंदु. **–radius** अरित्रिका. **Angularity** सकोनता, कोन-विशिष्टता. **Angulated** कोनप्रचुर, कोनांनी झालेला, कोनात्मक, कोनविशिष्ट.

**Anharmonic ratio** अहरात्मक निष्पत्ति, आगायन निष्पत्ति.

**Anhydried** अनुदक, निरुदक, अनार्द्र. **Anhydrous** अनार्द्र, निर्जल, अजल, विजल.

**Anicut** धरण (अॅनिकट् हा तामिल भाषेतला शब्द आहे).

**Animal charcoal** हाडांचा-प्राणिज कोळसा.

**Anion** धनायन, ऋण अतिपरमाणु.

**Anna** ६८$\frac{1}{16}$ चौरस फूट, $\frac{1}{16}$ इंच.

**Anneal** पाणी उतरणे (तापवून सावकाश निवूं देणे म्हणजे पाणी उतरणे व तापवून पाण्यात विझविणे म्हणजे

पाणी देणे). **Annealing** निस्तापन, तापानुशीतन, कोमलायन, ज्यामध्ये कर्बाचे प्रमाण अधिक असते अशा 'हाय कार्बन स्टीलला', उष्णता देऊन मृदुता आणण्याची एक पद्धत.
**Annexe** विस्तार-भवन, उप-भवन.
**Annihilator** शून्यकारी.
**Annual intensity** वार्षिक भरमान. **Annual mean monthly range** वार्षिक मि. म. विवार (मि.=मिहिर–, मिहिरिक. म.=मध्यम). **Annual rings** झाडाची वाढ करणाऱ्या नियतकालिक किंवा वार्षिक कड्या; त्यांच्या संख्येवरून अजमासे झाडाचे वय ठरविता येते.
**Annuity** वर्षासन. **–certain** सावधि वर्षासन. **–deffered** विलंबित वर्षासन. **–immediate** अविलंबित वर्षासन. **–perpetual** निरवधि वर्षासन.

Annual rings : वार्षिक कड्या

**Annular** वलयाकार, मंडलाकार, वाटोळा, कंकणाकार. **–eclipse** कंकणग्रहण. **–rings** समकेंद्र वर्तुळे. **–vault.** पहा Barrel Vault.
**Annulet** स्तंभशीर्षाच्या तीन भागांपैकी खालील भागातील चपटे कडे, डोरिक शिल्पात स्तंभ-शीर्षाच्या खालील भागात अशी अनेक कडी दिसतात.

Annular rings : समकेंद्र वर्तुळे

**Annuliform** मंडलाकार, कंकणाकार.
**Annulose** आंगठ्या असलेले, आंगठ्याचे (केलेले).
**Anode** धनप्रस्थ, पराग, धनवीजायक, धनध्रुव, धनाग्र. उद्गामीमार्ग. **–modulation** धनाग्र मिश्रण, **–load** धनाग्रभार.
**Anomalous expansion** (पाण्याचे) अपवादात्मक प्रसरण.
**Anomaly** विसंगती, मंदकेंद्र, परिक्रम (परिक्रम नेदिष्ठापासून व भोगांश वसंत संपातापासून मोजतात). **Apparent anomaly** अन्वक्ष परिक्रम. **Mean anomaly** मध्यम परिक्रम.
**Anorthic** विषम कोणीय. **Anorthite** अनोर्थाईट.
**Anta** (*pl.* **Antæ**) चौकोनी आकाराचा वेगळ्या प्रकारचा असा (ग्रीक देवळांच्या पाख्याच्या भिंतीच्या शेवटी किंवा दरवाजापुढे बसविलेला) खांब.
**Antapex** प्रतिमूर्धा.
**Antarctic circle** दक्षिण-ध्रुव-वृत्त, कुमेरू, प्रति-आर्क्षवृत्त, **–ocean** दक्षिण महासागर. **Antartica** दक्षिण ध्रुवाच्या आसपासचा ५,३००,००० चौरस मैलांचा प्रदेश.
**Antarala** अंतराल; देवळापुढील (विशेषतः दोन इमारतींना जोडणारी) ओटी.
**Antecedent** पूर्वपद, अग्रपद, प्रमाणातले पहिले पद.
**Antechamber, Anteroom** सदरेची खोली, दिवाणखान्याच्या अलीकडील खोली, सभोपगृह, सभासीमगृह.
**Antefix** (*pl.* **Antefixæ**) वळचणीत सारख्या अंतरावर बसविलेले नक्षीदार ठोकळे.
**Ante-Meridian (a. m.)** प्रतिमध्यमंडल, पूर्वाह्न, मध्याह्नसमयात्पूर्वम्. म. स. पू. (अ. म. अग्रमध्याह्न).
**Antenna or Aerial** आकाशीय.
**Ante-solarium** सूर्यमुखी सज्जा.
**Ante-venna** छत, वितान.
**Anthemion** स्तंभशीर्षाचा तळ, कंगणी किंवा गलथा यांच्या ग्रीक किंवा रोमन शिल्प पद्धतीच्या नक्षीचे विविध प्रकार.
**Anthracite** अन्थ्रासाईट कोळसा.
**Anthropolite** अश्मीभूत मानवास्थि-मनुष्याच्या अस्थींचे झालेले दगड. **Anthropology** मानवजाति विज्ञान.
**Antibiotics** प्रतिजैविक पदार्थ, प्रतिजैविकी.
**Antichlor** हरिननाशक, हरंहर.
**Anticlastic** उभयपार्श्वीय.
**Anticline** कमान.
**Anticlineal axis** शिखररेषा, एकाच शिखराकडे जाणाऱ्या रेषा.
**Anti-clockwise, Counter-clockwise** अपसव्य, प्रतिघटि, वामवक्र, वामावर्त.
**Anticorrosive** जंगरोक.
**Anti-cyclone** प्रत्यावर्त, भोंवऱ्याच्या उलटवारा-प्रतिविवर्त, प्रतिचक्रवात.
**Anti-log** विलाग. **Antilogarithms** प्रतिलघुगुणक.
**Antimony** सुरम्याचा धातु, अंज, अंजन, घ. फु. वजन ४१६ पौंड.
**Anti-node** विक्षोभ, संक्षोभस्थान, प्रस्पन्द.
**Antipodal** प्रतिपाद. **Antipode** प्रतिविन्यस्त, प्रति-ध्रुवस्थ.
**Antiquarian** या नावाच्या (नकाशाच्या) कागदाचा आकार ५३″ × ३१″ चा असतो.
**Antiques** पुराणवस्तु.
**Anti-resultant** प्रत्यादेशक, प्रतिसमासक, प्रतिपरिणामी.
**Anti-sag-bar** स्वतःच्या वजनाने वाकू नये म्हणून कैचीच्या ताणशिगेला उचलून धरणारी उभी शीग.

**Antiseptic** रोगाणुरोधक, पूतिस्तंभक-नाशक-भंजक, कोथघ्न, किडे पडू न देणारे द्रव्य.
**Anti-submarine** पाणबुडी वेधी नौका.
**Anti-syphon** निनाल, साइफन-रोक. **Anti-syphonage pipe (or Vent pipe)** उच्छ्वास नळ.
**Anvil** ऐरण, ऐरणी, हरण, शिगाडा, खुरा संदान, (नालबंदाचा) उभारा, उभाळा, (लहान) संदान, छोटी ऐरण. **–chisel, –cutter.** ऐरणीच्या भोकांत घालून कापण्याची छिन्नी. **–for hammering vessels** खरवई.
**Apartment** खण, खोली, कोठडी, वठाण, दालन, दालान, कोष्ठ, आगार. **–dupleix** दुपोटी मजला. **Cooking apartment** ओयरा, ओवरा, स्वयंपाकघर. **Having two apartments** दुखणी, दुघई. **Having three apartments** तिखणी, तिघई. **Having four apartments** चौखणी, चौघई. **Inner or female apartment** अंत:पुर. **Inner apartments of a house** अंतर्गृह. **Largest apartment** चापेखण. **Private apartment** गोशा.
**Apatite** अपाटाईट (खनिज) अनेकरंगी पाषाणाची एक जात.
**Aperture** आस्युद्वार, द्वारक, भेग, छिद्र, खिड, खिडकुलीं, दूरदर्शक व्यास. **–in the wall or roof for entrance of light or for the egress of smoke** साणे.
**Apex** कळस, शिखर, अग्र, शिरोबिंदु, अभिबिंदु, शंक्वग्र. **–stone or Saddle stone** चांदईच्या भिंतीच्या माथ्यावरील तिकोनी दगड. **–of the Sun's way** सौरगंतव्य.
**Aphelion** दविष्ठ, अपसूर्य, ग्रह किंवा धूमकेतूच्या कक्षेतील अतिदूरचा बिंदु, सूर्योच्च.
**Aphis brush** झाडावरील कीड काढण्याचा ब्रश.
**Apiary** मधमाशा राखून ठेवण्याचे स्थळ, मधुमक्षिकालय. **Apiculture** मधमाशांची जोपासना, मधुमक्षिका-संवर्धन.

Apiary : मधुमक्षिकालय

**Aplastic** बेमिलाफ, अमेलनकारी.
**Apogee** दविष्ठ (अपभू, अपसूर्य) भूम्युच्च, चंद्रोच्च, शीघ्रोच्च, चंद्राचे उच्चस्थान, दूरतम अंतर.
**Apomecometer** 'ऑपटिकल् स्क्वेअर' व 'सेक्स्टंट' या दोहोंचीही उपयुक्तता या उपकरणात साधली आहे. याने झाडे किंवा इमारती यांची उंची व अंतर काढता येते. जेव्हा उपकरण इमारतीपासून तिच्या उंची इतक्याच अंतरावर असेल तेव्हाच इमारतीचा माथा व तळ यांची प्रतिबिंबे एकत्र दिसतील या तत्त्वावर या उपकरणाचा शोध आधारलेला आहे.
**Apophyge** स्तंभदंडाच्या खालवरच्या (उथळा व शीर्ष) टोकांची अंतर्गोल नक्शी.
**Apophysis** (of erruptive rocks) अधोभाग, अंतर्भाग.
**Apothecaries' weights** औषधांसाठी वापरली जाणारी वजने.

Apophyge : अंतर्गोल वक्र नक्शी

**Apparatus** उपकरण, सरंजाम, प्रयोगाची साधने, संज, संच यंत्रसामग्री, साहित्य, साजसरंजाम, साज, संभार. **–room** उपकरणालय, अवजारघर.
**Apparel** तारवाचे सामान (शीड, दोरखंडे वगैरे).
**Apparent** अन्वक्ष, साक्षात्. **Apparent horizon** दृष्ट क्षितिज. पहा Sensible horizon. **–magnitude** दृश्यप्रत, भासमान प्रत्यंक-प्रतिक्रम. **–solar time** अन्वक्ष सौर वेला, अ. सौ. वे.**–mean solar time** म. सौ. वे. **–solar day** अन्वक्ष सौर दिवस.
**Appearance of colour** वर्णव्यक्ति-उमटणे.
**Appliance** प्रयुक्ति, साधन, यंत्र, हत्यार, सरंजाम.
**Application** आरोपण, योजना, विनियोग, योग.
**Applied** अनुप्रयुक्त, उपयुक्त, व्यवहारोपयोगी, व्यावहारिक, उपयोजित. **–mathematics** प्रयुक्त गणित.
**Approach** उपान्त, औपान्तिक. **road, Approaches (Cul-de-sac)** आगममार्ग, अभिमार्ग, उतार, जोडरस्ता, औपान्तिक रस्ता, पहुंच-मार्ग. **Velocity of approach.** पहा Velocity.
**Appropriation** उद्दिष्ट हेतूसाठीच दिलेल्या पैशाचा उपयोग करणे. **Re-appropriation.** पहा R.
**Approximate** अंदाजी, आसन्नमान, अदमासे. **Approximation** आसन्न क्रिया. **–rough** स्थूलमानाने.
**Appurtenance** अंगभूत पदार्थ-विषय-वस्तु-स्थान.
**Apriori** अनुभवपूर्व (निष्कर्ष).
**Apron** उंबरा, आपत्र, वारित्र, मलवस्त्र. गोदीच्या दरवाजापुढचा पाणी अडवणारा चौथरा-पाणथोप, सांडेवरून पडणाऱ्या पाण्याच्या झोतास तोंड देणारा फरशीचा ढाळ, रंध्यातील पाते घट्ट करणारी पाचर, समुद्राच्या धडका देणाऱ्या लाटांना थोपविणाऱ्या भिंतीच्या पायथ्याशी रिचलेल्या कॉंक्रीटने भरलेल्या गोणी किंवा शिलाखंड. **-pieces** लाकडी जिन्याच्या तरकांच्या वरच्या टोकास आधार देणारे आडवे लाकूड. **–walls** वारित्र भिंत, मलभित.
**Apse** स्तब्धिका, विकोच, उच्च, चर्चच्या इमारतीचा वर्तुलाकार किंवा बहुकोनाकृति भाग. **–line** रेखा, स्तब्धिका-उच्चातर, उच्चरेषा. **–point** उच्चबिंदु.
**Apsis** (दीर्घ वर्तुलात) उच्च किंवा नीच बिंदु (*pl.* **Apsides**). मंदोच्च शीघ्रोच्च, विकोच. **Apsidal** बृहदक्षासंबंधी. **Apsidalplane** बृहदक्षप्रांत. **The line of the apsides** नीचोच्च-रेखा, विकोचरेषा, उच्च-नीचरेषा, शीघ्रोच्च मंदोच्चसूत्र.

**Apterous, Apteral** अपंख-अस्तंभ-बाजूचे खांब नसलेले देऊळ.

**Aqua** (*pl.* **Aquaria**) पाणी. **–fortis** तीव्रजल, नत्रिकाम्ल. **–regia** जलराज. **Aquarium** मत्स्यालय, जलजपात्र, फक्त पाण्याने वाढणाऱ्या वनस्पती, मासे इत्यादि जलचरांचे तसेच जलवनस्पतींचे सजीव नमुने ठेवण्याकरिता तयार केलेले तळे अगर भांडे. **Aquacrete** जलाभेद्य पोर्टलंड सिमेंटकंक्रीट. **Aquajet drinking fountains** कारंजी पाणपोई. **Aqua-privy** पाणसंडास, जलोत्सर्जक शौचकूप. **Aquatic** जलीय, जलज, जलचर, जलस्थ. **–vapour** सजल बाष्प.

Aquarium : मत्स्यालय

**Aqueduct** जलसेतु, परिवाह, आपोत्तार, लहांगी, जलवाहक पूल, नळ, जलप्रणाली, सारणी, खोल नद्यांवरून जाणाऱ्या कालव्यांसाठी अशा बांधकामाची जरूरी असते. दरीच्या या काठावरून त्या काठावर पाणी नेणारा नळ.

**Aqueous** सजल, वारिज, जलज, प्रस्तर, जलप्राय, जलजन्य, जलसंभूत, अनूप.

**Aquifer** जलप्रस्तर, जलभृत.

**Arabesque** वेलपत्रीच्या गुंफणदार नक्षीचे अरबी रंगकाम किंवा खोदकाम.

Arabesque : वेलगुंफण

**Arabic acid** गोंदाम्ल. **Arabine** गोंदिन. **Arabinose** गोंदशर्करा.

**Arable** लागवड करण्याला योग्य, जिराइती, कीर्दसार. **–land** शेतजमीन, नांगरलेली, जिराईत, काळी (जमीन).

**Araeostyle** स्तंभाच्या खालील व्यासाच्या चौपट किंवा अधिक स्तंभांतर असलेली स्तंभावली, स्तंभांतर व्यासाच्या साडेतीनपट असलेली स्तंभावली.

**Arbitrary** परिकल्पित, काल्पनिक, मनःपूत, अनियंत्रित, यादृच्छिक, स्वेच्छ.

**Arboretum** शास्त्रीय शोधांकरिता निरनिराळ्या झाडांचे आणि झुडपांचे संग्रहालय. **Arboriculture** वृक्षवर्धन, उपयोग-शोभा ह्याकरिता झाडांची केलेली लागवड. **Arboriculturist** वृक्षवर्धनज्ञ. **Arborist** वृक्षज्ञ, वृक्षवेत्ता. **Arbour** जाळीदार मंडप, कुंज, लतामंडप, शांतिस्थान, चाकांचा आंस.

**Arc** अर्चि, वृत्तक, वृत्तखंड, कंस, चाप, वर्तुळाच्या परिघाचा भाग, परिघैकदेश, धनु, विद्युज्ज्योत, धनुक, धनुका, धनुष्क. **Complement of an arc to 90°** कोटि. **Diurnal arc** दैनिक चाप. **Measurement of an arc** धनुःफल, ज्याफल. **Nocturnal arc** नैश चाप. **Versed sine of an arc** उत्तर ज्या. **Arc boutant.** पहा Flying buttress. **arc cos** चाप कोज्या. **Arc cosec** चाप व्युज्या. **Arc cot** चाप कोस्प. **–lamp** विद्युत् कमान. **–of meridian** माध्यान्ह वृत्तीय चाप. **–of vision** दृश्य चाप.

**Arcade** स्तंभांवरील कमानींचा रस्ता, लादनीचा रस्ता, एका रांगेतील कमानींचा मंडप, वरून झाकलेल्या कमानदार छपराचा रस्ता, महिरापांची रांग, छायेचा मार्ग, दुतर्फी दुकाने Arcade : तोरणपथ असलेला रस्ता, तोरणपथ.

**Archery** धनुर्वेध, धनुर्विद्या. **Arcuate** कमानदार, धन्वाकार. **Arcuation** कमानदार-धन्वाकार करणे.

**Arch** चाप, कमान-ण, कमा, मेहेराप, महिराप, तोरण. कमानदार करणे, कमान लावणे. **–bar** सपाट कमानीला आधार देणारा लोखंडी पाटा. **–let** लहान कमान. **–rib** कमानशलाका, कमान पर्शुका, कमापर्शु. **–ring** कमानीचे कडे, कमाकटक, कमानेमि. **–stone** अचकोन, पलखा, नेमिस्थ. **–way** कमानीचा रस्ता. **–wise** कमानीच्या आकाराचे. **Arched** कमानी, कमानदार, कमानदार, तोरणाकार, मेहेरापदार. **–beam** छप्परास आधार देणारे कमानीच्या आकाराचे केलेले बहाल **–bridge** कमानीचा पूल, कमानोत्तार **–buttress.** पहा Flying buttress. **–dam** कमानी बांध. **Blind arch** दर्शनी आभास-मेहराब-कमान. पहा B. **Cambered arch** सपाट बहिर्नेमि व भवार दिलेली अंतर्नेमि असलेली कमान, उपेटी कमान, चपटी उभरी कमान. **Cinquefoil arch** पांचपाकळी कमान. **Carbelled arch** झुका वाची कमान, घोडेकमान. **Depressed three centred arch** त्रिकेंद्री बैठी कमान. **Discharging or Relieving arch** मुकी कमान, सहायक कमान **Diurnal arch** दिनचाप. **Drop or Obtuse arch** समभुजी बैठी कमान. **Dutch arch.** पहा French arch **Elliptical arch** अंडाकृति-दीर्घवर्तुलाकृति कमान **Equilateral arch** समत्रिभुज त्रिकोणी कमान. **Five centred arch** पंचकेंद्री कमान. **Flat or Straight arch** चपटी-सपाट कमान. **Florentine arch** अर्ध गोल अंतर्नेमि व कोंचदार बहिर्नेमि असलेली कमान **Fourcentred (Tudor) arch** चतुष्केंद्री कमान **French arch.** पहा F. **Gauged arch** कांटेको घडीव विटांची कमान. **Gothic arch.** पहा Pointed arch. **Horseshoe or Stilted arch** नालकमान **Inverted arch** उलटी कमान. **Italian Pointed arch** इटालिअन साग्र कमान. **Joggled or Flat arch** चपटी-सपाट कमान. **Lancet arch** उभट महिरप-मेहरप कमान. **Multifoil arch** बहुपर्णी कमान. **Murish (Moorish) multifoil arch** मूर बहुपर्णी कमान. **Nocturnal arch** रात्रिचाप कमा

१. Triangular : तिकोनी. २. Corbelled : झुकावाची घोडे कमान. ३. Italian pointed : इटालियन साग्र. ४. Pointed sarasenic : साग्र सहारी. ५. Pointed horseshoe : साग्रनाली. ६. Parabolic : कोचकीची. ७. Rampant : अनियंत्रित. ८. Two centred : द्विकेंद्री. ९. Fourcentred tudor : चतु:केंद्री. १०. Equilateral : समत्रिभुज. ११. Drop or Obtuse : समभुजी बैठी. १२. Lancet (pointed) : उभट महिरप. १३. Ogee : विनिकु. १४. Ogee : कुण्डलिनी. १५. Pseudo four centred : कृत्रिम चतु:केंद्री. १६. Pointed segmental : साग्रवृत्तखंडी. १७. Three centred : त्रिकेंद्री. १८. Pseudo three centred flat (Tudor) : कृत्रिम त्रिकेंद्री. १९. Elliptical : दीर्घवर्तुलाकृति २०. Depressed three centred : त्रिकेंद्री बैठी. २१. Common horseshoe : नाल. २२. Round horseshoe : गोल नाली. २३. Florentine : फ्लॉरेन्टाइन. २४. Semi-circular or Full centred : निमगोल. २५. Semi-circular stilted : निमगोल घोडेकाठी.

२६. Cinque foil : पंचपर्णी. २७. Multi foil : बहुपर्णी. २८. Pointed trifoliated : साग्र त्रिपर्णी. २९. Pointed trefoil : साग्र त्रिदली. ३०. Round trefoil : गोल त्रिदली. ३१. Round trifoliated : गोल त्रिपर्णी. ३२. Moorish multifoil : मूर बहुपर्णी. ३३. Venetian : व्हेनिशिअन. ३४. Early English trefoil : इंग्रजी त्रिदली. ३५. Joggled or flat or straight : चपटी-सपाट. ३६. Shouldered or Sq. headed trefoil : स्कंध.

३७. Squinch arch : बगल कमान
३८. Cambered : बाह्य गोल

४१. Flat or Chambered Gauged arch : सपाट

३९. Plain brick arch : उभ्या विटांची
४०. Gothic arch : साग्र तोरण

४२. Segmental arch : वृत्तखंडी

४३. Gauged arch : घडीव विटांची

४४. French or Dutch arch : फ्रेंच-डच

४५. Ordered arch : (विटांची) संयुक्त

of unknown rise. of known rise.

४६. Five centred : पंचकेंद्री

४७. Pointed arch in three orders : (विटांची) साग्र संयुक्त.

४८. Venetian pointed arch : साग्र व्हेनिशिअन

४९. Inverted arch : उलटी

५०. Relieving or discharging : मकी

Ogee-ogeval arch विनिकुकनम a Ordered arche टप्प्यांची वीट कमान. Prabolic arch कोचकीची कमान. Pointed arch साग्रतोरण, अंतर्नेमि व बहिर्नेमि समांतर नसलेली कमान. Pointed horse-shoe arch साग्रनाली कमान. Pointed saracenic arch साग्रसहारी कमान. Pointed segmental arch साग्रवृत्तखंडी कमान. Pointed trefoil arch साग्रत्रिदळी कमान. Pointed trifoliated arch साग्रत्रिपर्णी कमान. Pseudo four centred arch कृत्रिम चतुष्केंद्री कमान. Pseudo three centred arch कृत्रिम त्रिकेन्द्री कमान. Rampant arch अनियंत्रित कमान. Rough axed arch ताशीव विटांची कमान. Round horseshoe arch गोलनाली कमान. Round trefoil arch गोल त्रिदळी कमान. Round trifoliated गोल त्रिपर्णी कमान. Segmental arch वृत्तखंडी-किंचितगोल-एककेंद्रीकमान. Semicircular or Full centred arch निमगोल-अर्धवर्तुळी कमान. Semicircular stilted arch निमगोल-अर्धवर्तुळी घोडेकाठी कमान. Shouldered arch स्कंधकमान. Skew arch इराप कमान. Squinch Scoinson arch. पहा S. Three centred arch त्रिकेंद्री कमान. Triangular arch तिकोनी कमान. Trimmer or Coach-head trimmer arch बेतीव वीट कमान. Triumphal arch विजयतोरण, विजयस्मरणार्थ कमानदार तोरण. Venetian arch व्हेनेशिअन कमान.

**Archdeaconry** बिशपच्या साहाय्यकाऱ्याचे राहण्याचे ठिकाण, -चा हुद्दा.

**Archæology** पुरातत्त्व-पुराणवस्तुशास्त्र, पुराणवस्तु-विज्ञान, पुरातनवस्तुशास्त्र. फार प्राचीन-इतिहास-वस्तूंचे वर्णन. शिलालेख-जुनी देवालये-जुन्या पोथ्या व ग्रंथ वगैरेंचा अभ्यास. **Archæological** प्राचीन वस्तुशास्त्रासंबंधी. **Archæologist, Archæologian** पुराणवस्तु-शास्त्रवेत्ता, पुरातत्त्ववेत्ता.

**Archimedian screw** आर्किमेडिसने शोधून काढलेले पाणी ओढण्याचे मळसूत्री यंत्र. **Principle of Archimedes, Archimedes' Principle** 'कोणत्या ही प्रवाही पदार्थात बुडविलेली वस्तु वजन केली असता त्या वस्तूने बाजूला सारलेल्या प्रवाही पदार्थाच्या वजनाने कमी भरते', हे आर्किमेडिसन (इ.स. पूर्वी सुमारे ३०० वर्षे) शोधून काढलेले तत्त्व आर्किमिडिसचा सिद्धांत **Archimedean drill** मळसूत्राने मिळणाऱ्या पुढे मागे होणाऱ्या अक्षीय गतीमुळे पाते फिरणारा सामता.

Archimedian screw : आर्किमेडिसचा मळसूत्री रहाट

**Archipelago** द्वीपसमूह, द्वीपसंग्रह, द्वीपपुंज.

**Architect** वास्तुशिल्पी, शिल्पकार, शिल्पशास्त्री, घरबेत्या, इमारतशास्त्र जाणणारा, स्थपति. **Architecture** गृहशिल्पशास्त्र, शिल्पशास्त्र, वास्तुशिल्प, वास्तुसौंदर्यशास्त्र, वास्तुविद्या, कलापूर्ण वास्तु बांधण्याचे शास्त्र. **–, Modern** आधुनिक. **–, Organic** जैव, सेंद्रीय. **–, Traditional** परंपरीय. **Architectural** शिल्पशास्त्रानुसार, गृह-शिल्पीय, स्थापत्य. **–drawing** शिल्पीनकाशा, शिल्पगतचित्र.

**Architraves** (Consists:—Tænia, upper facia, lower facia) रोमन डॉरिक खांबावरील फ्रेमच्या खालचे पहिलेच दोन थर; या दोन थरांना अपर फेसिया व लोअर फेसिया असे म्हणतात. दरवाजा किंवा खिडकीच्या सभोवती फ्रेम व भिंत यांचा सांधा झाकण्यासाठी केलेली उठावदार नक्षी, प्रस्तर-पाद **–block** दरवाजा किंवा खिडकीच्या भोवतील नक्षीच्या पट्टीचा आधार-ठोकळा. **–cornice** एनटॅब्लेचरचा (आर्किट्रेव्हच्या वरचा) कंगणीचा भाग. **–jambs** खिडक्या-दरवाज्यांच्या नक्षीदार बाह्या-दारकस.

Architrave : प्रस्तरपाद

**Archives** ऐतिहासिक लेखसंग्रह, ऐतिहासिक पुराव्याचे कागदपत्र, सरकारी जुने लेख. दप्तर, दप्तरखाना, राजकार्य-लेखरक्षणस्थान, अभिलेखागार, पुरालेख. **Archivist** दफ्तरदार, दफ्तरांचा रक्षक, पुराभिलेखपाल.

**Archivolt** तोरण पालिका, कमानीतील गलथा (गुळगुळीत किंवा वक्रकड–कोर), कमानीच्या दर्शनीभागाभोवती केलेले उठावदार नक्षीकाम.

**Arctic** उत्तरध्रुवाकडील, सुमेरू. **–circle** उत्तर ध्रुव-वृत्त, आर्क्षवृत्त. **–ocean** उत्तरमहासागर.

**Arctophylax** (E. bear-keeper) भूतप.

**Arcuate** कमानदार.

**Are** फ्रान्स देशात शंभर चौरस मीटरचे क्षेत्रास ही संज्ञा आहे. १,०७६·४४ चौरस फूट, ११९·६ चौरसवार किंवा शंभर चौरस मीटरचे एक फ्रेंच माप.

**Area** आकारमान, क्षेत्र, क्षेत्रफळ, जागा, गर्भ, अभ्यंतर, अंगण, मैदान, मोकळी जागा. **–assessed** करायित-कराहित क्षेत्र. **–computation** क्षेत्रमापन. **–cultivated** लागवडीचे क्षेत्र. **–irrigated** पायनित-पायित क्षेत्र. **–leased** प्रतिश्रुत क्षेत्र, प्रत्याहित क्षेत्र. **–of lift irrigation** उत्पायनिक क्षेत्र. **–matured** पक्वायित क्षेत्र. **–nonperennial** अपरिवार्षिक-

अपरिवार्ष क्षेत्र. **–perennial** परिवार्षिक-परिवार्ष क्षेत्र. **–remitted** विसृष्टित क्षेत्र. **–superficial** पृष्ठ क्षेत्रफल. **–under command** वशागत क्षेत्र, पायन क्षेत्र. **–culturable commanded, –culturable irrigable.** पहा Culturable. **–culturable lift** सैरिकेय उत्पायनिक-उत्पायनीय क्षेत्र, उ. सै. क्षे. **–gross** संक्षेत्र. **–gross commanded** वशागत संक्षेत्र. **–gross irrigable** पायनिक संक्षेत्र. **–gross lift** उत्पायनिक संक्षेत्र. **Areal method** क्षेत्रपद्धति.

**Arena** रंगभूमी, रणांगण, रंगण, रंग, आखाडा, हौदा, मल्लभूमि, पटांगण, तालीमखाना, चौक, रोमन नाटकगृहातील मध्यावर रेती टाकलेली व कठडा घातलेली जागा.

**Areometer, Hydrometer** तरकांटा, द्रवमापक, जलगुरुत्वमापक.

**Argenti Ferous** रजत-रौप्ययुक्त.

**Argil** कुंभारी माती, भांडी करण्याची माती, पांढरी माती. **Argillaceous** मृण्मय, कुंभारमातीचा.

**Argon** रॅले व रॅम्से यांनी इ. स. १८९४ त हवेतील नवीन शोधून काढलेला एक घटक, आर्गन.

**Argument** उपकरण, विकरण (ग.) विवरण, युक्तिवाद.

**Arid** निपराळ, निपाळ, रूक्ष, रखरखीत, निर्जल (प्रदेश), धापड, उखर, निपळवट. **Semi arid** आरूक्ष.

**Aries** २१ मार्चला सूर्य प्रवेश करतो ती मेष रास.

**Arithmetic** अंकगणित, व्यक्तगणित, हिशोब, पाटीगणित. **–of fractions** अपूर्णांकगणित. **–of intigers** पूर्णांकगणित. **–of known quantities** व्यक्त गणित. **–mean** गणितमध्य. **–of unknown quantities** अव्यक्तगणित. **The eight rules of arithmetic** परिकर्माष्टक. **Addition** संकलन, मिळवणी. **Subtraction** व्यवकलन, वजाबाकी. **Multiplication** गुणन, गुणाकार. **Division** भाजन, भागाकार. **Raising to the square** वर्ग. **Extracting the square root** वर्गपद-वर्गमूळ काढणे. **Raising to the cube** घन करणे. **Extracting the cube root** घनपद-घनमूळ काढणे. **Arithmetical** गणिताचा, गणिती. **–progression** योगश्रेणी, गणितश्रेणी-श्रेढी, समानान्तर श्रेढी-णी, व्यक्त श्रेढी-णी. **Arithmetically** गणिताच्या रीतीने. **Arithmetician** अंकगणिती, गणित्या. **Arithmometer** गणनयंत्र. **Book of arithmetic** मेस्तक. **Wellknown treatise on arithmetic** 'लीलावती' (भास्कराचार्यांची).

**Ark** गृहनौका. पहा 'Noah's ark'.

**Arm** शाखा, बाजू, भुज, भुजा, बाहु. फांटा, आरा, आडा. **– s of the angle** कोनबाहु. **–of a force** प्रेरकाचा हस्तक. **–of a mathematical figure** भुज. **Navigable arm** तरती खाडी. **Arm's reach** हातटप्पा. **Arm of the Sea** खाडी, चिंचोळा फांटा. **Arm of an arm of the Sea** ओहर, खोची, फांसू, पोहडी, पोईड. **Arm of a tree** खांदी, फांदडा.

**Armature** बिडाच्या पातळ पट्ट्यांची जुडी. लोहाकर्षण संरक्षक पट्टी, मॅग्नेटोसमधील धोटा, लोहचुंबकाची दोन टोके (ध्रुव) जोडणारी लोखंडाची पट्टी, लोहखंड. लहान झाडांचे रक्षण व्हावे या हेतूने त्या भोवती घातलेले काटयांचे अथवा तारांचे कुंपण, अंतर्भुज, धात्र.

**Armco pipes** रस्त्याच्या मोरीसाठी उपयोगात येणारे जाड पन्हळी पत्र्यांचे दंडगोलाकृति नळ.

**Armilla** लोखंडाचे कडे. **–sphere** कड्यांचे खगोलयंत्र.

**Armoured** कवचित. **Armoury, Armory, Arsenal** शस्त्रागार, शिलेखाना.

**Armstrong scale** (शोधकाच्या नावावरून पडलेल्या नावाची), 'आर्मस्ट्रॉंग मेजपट्टी'. चार बाजूंच्या आठ कडांवर एकेक अशी जी आठ वेगवेगळी मेजप्रमाणे या पट्टीवर दाखविलेली असतात ती अशी : एक फुटास ३″ व १½″, एका फुटास ¾″ व ⅜″, एका फुटास १″ व ½″, एका फुटास ⅛″ व ¼″.

**Arnott valve** 'अर्नोट व्हाल्व'. हा खोलीच्या तक्तपोशी लगत बसविलेला एक झडपी पडदा असतो. यातून उष्ण दूषित हवा चिमणीमार्गे निघून जाते व आपोआपी झडप मिटल्याने अर्थातच ती परत येऊ शकत नाही.

**Arogonite** अरागोनाईट.

**Arrangement in parallel** समांतर जोडणी-रचना.

**Arrangement in series** एकसर जोडणी.

**Arrest point** अवरोध अंक.

**Arris** (रंधलेले) लाकूड, दगड किंवा धातूची अणीदार कड-कोन-कोपरा, डोंगरी खडकाची धारदार किनार. **–gutter** V आकृतीचे गटार. **–tiles** कोनकौले. ढापे. **Arris-wise** तिरके.

१ Arris कड. २ Stop chamfer चढता त्रिकोण. ३ Chamfer पाटा.

**Arrows** लोखंडी तीर (जमीन मोजणीच्या कामात लोखंडी सांखळचा मोजण्यास यांचा उपयोग करतात).

**Arsenal** आयुधशाला.

**Arsenate** तालित. **Arsenic** ताल. **Arsenic-acid** तालिक अम्ल. **Arsenious** तालस अम्ल. **Arsenite** तालायित. **Arseniuretted hydrogen** तालसंयुक्त उज्जन.

**Art** हुन्नर, कसब, कला, शिल्पविद्या. **Commercial art** वाणिज्य-व्यवहारकला. **Fine arts** ललित कला, विदग्ध कला. **Mechanical arts** यंत्रकला. **Art school** कलाभवन, शिल्पशाळा. **Arts man** कला-निपुण-कलाप्रवीण-कलावंत माणूस.

**Arterial road** मुख्य रस्ता, रथ्या.

**Artery** प्रवाहिनी. **Arteriole** उपप्रवाहिनी.

**Artesian wells** कारंजी विहिरी, भूगर्भस्थ विहीरी, पार्श्ववापी, जमिनीत पाण्याची शीर सापडेपर्यंत यंत्राने रंध्र खोदून वर आणलेल्या झऱ्याचे पाण्याच्या विहिरी; ही शीर विहिरी-

Artesian well : कारंजी विहीर.

च्या जागेपेक्षा उंचावरून येत असल्यामुळे हे पाणी आतील जोराने यंत्रकृत रंध्रातून वर येते. या विहीरी फ्रान्समध्ये आर्टाइस नावाच्या खंड्यात प्रथम पाडल्या व त्यावरून त्यास 'आर्टीझन' असे नाव पडले. **–spring** उत्प्रेह, उज्झर.

**Arthrodia** चक्रगतिक संधि. **Articulation** संधि.

**Artificer, Artisan** कल्पक शिल्पकार, हिकमती कारागीर, कारीगर, कारू, शकल्या, शिल्पी, हस्तव्यवसायी, कसबी, वर्धकी. **Artisanship** शिल्पकर्म.

**Artificial fog** (शत्रूला पुढचे काही दिसू नये म्हणून उत्पन्न केलेले) कृत्रिम धुके. **Artificial magnet** कृत्रिम-बनीव चुंबक.

**Artillery park** लढाईच्या तोफा ठेवण्याची जागा, तोफखाना.

**Artist** शिल्पकार, शिल्पज्ञ, कसबी. **Artistic** कौशल्य-पूर्ण, खुबीदार. **Artistical** कारागिरीचा, खुबीदार. **Artistically** कारागिरीने, शिल्पचातुर्यपूर्वक.

**Aryaka** पाच ध्यानमग्न बुद्धांचे प्रतीक दाखविणारी पूजनीय स्तंभावली.

**As.** अर्धा औंस वजनाचे तांब्याचे नाणे, रोमन लोकांचे बारा औंसांचे वजनी माप.

**Asbestos, Asbestus** तपत्राण, अग्नीत न जळणारा आसबस्ट नावाचा खनिज पदार्थ, वजन घ. फु. १५३ पौंड. जलचामर (हे लवचिक दगड अरवलीच्या डोंगरात झिंद संस्थानात व निलगिरीत पण सापडतात). 'सेकिमे-न'; दगडीकापूस या अर्थाचा जपानी शब्द. **–cement** असबस्ट सिमेंट. **–lagging** आसबेस्टासची माती. **–lining** आसबेस्टास कागदाचे अस्तर. **–paste** आसबेस्टास कागदाचे गिलीस. **–sheets** तपत्राण-आसबस्टी सिमेंटचे पत्रे-तक्ते. **–wood** निर्दह लाकूड.

**Ascend** चढणे, आरोहण करणे, (नदीच्या) उगमाकडे जाणे. **Ascendant** त्रिभोनलग्न, लग्न. **Ascending** आरोही.



**–measures** चढती भांजणी, उभ्दंजन. **–n** उद्बिन्दू, उच्चपात. **–node of a planet's or** क्षेपपात. **–order** आरोहीक्रम. **–progress** चढती श्रेढी. **–reduction** चढती भांजणी.

**Ascent** चढ, चढण, चढणी, चढाव, आरोह, ऊर्ध्वंगमन, डग. **–of light bodies** लघुपदार्थोर्ध्वगमन. **–descent** चढउतार, चढण-उतरण. **Steep asc** उभासूळ.

**Ash, Ashes** राख, राखाडी, रक्षा, क्षार. घ. फू. वजन ते ४३ पौंड. **–coloured** भस्मी, भस्मवर्णी, भस्मीरं **–pan** बॉयलरच्या भट्टीच्या खालची राख साठविण सुपली डी. **–pit** राखेची खळी, आगगाडीच्या 'बॉयल तील राख साफ करण्याकरिता दोन रुळांमध्ये केलेले बांध **Volcanic ashes** ज्वालामुखी पर्वतातील राखेस पदार्थ. **Ashery** पोटॅशभस्म अथवा मोत्यांचे करण्याची जागा.

**Ashlar, Ashler** माठीव संगीन दगड चिरा. **–wo** **–masonry** माठीव संगीन दगडाचे बांधकाम, च घडलेल्या दगडांचे बांधकाम, चिराचित्य, चैर्य.

**Ashta-Bhadra** आठ बाजू असलेली तारका **Ashta-Dikpala** मधोमध एक व सभोवती आठ दि रक्षक दाखविणारे छतावरील नक्षीकाम.

**Asphalt** घ. फू. वजन १४४ पौंड, अस्फाल, आसप आशुपाल, एक जातीचे खनिज डांबर. डामरी, डां डामर लावणे. **–carpet** अस्फाल हांत्री. **–gr** अस्फाल ग्रावित. **–road** अस्फाल डांबरी **Asphaltic cement** आसफाल्ट किंवा बिचुमन अमेरिकन नांव.

**Aspiration** शोषण. **Aspirator** वायुकर्षक, शो शोषिणी.

**Assay** परीक्षा पाहणे, धातूची कसोटी पाहणे.

**Assemblage** समवाय.

**Assembly hall, (Aula)** सभागृह, सभामंडप, सभा

**Assessment of wells or of lands wate from wells** विहीरीच्या पाण्याने होणाऱ्या पिकांवरील

**Asses' bridge or 'L. pons asinoru** भूमितीतील पहिल्या पुस्तकाचा पांचवा सिद्धांत.

**Assize** स्तंभातला गोल दगड, बांधकामातल्या थराच्या

**Association** संश्लेषण, परिसंस्था, संगति, सहचार, सं **Associated** सहवासी, संयुत. **–with** संगत सहव संयुत.

**Assumption** गृहीत.

**Asymmetric carbon atom** असंमित परमाणु. **Asymmetry** असंमिति, असम्मि असमात्रता.

**Astanah** उमरा, देहली.

**A-starboard** जहाजाची उजवी बाजू, जहाज उजव्या बाजूकडे.

**Astel** खाणीमध्ये काम करणाऱ्यांचे डोक्यावर वरून काही पडू नये म्हणून बांधलेली फळ्यांची कमानदार मांडणी.

**Astern** जहाजाची मागची बाजू, जहाजाच्या मागच्या बाजूकडे.

**Asteroid** लघुग्रह (चूर्णिका).

**Astigmatism** विषमदृष्टी, अनैक्य (भिकाश), एक अपभ्रेष.

**Astragal** तावदानी खिडकीतल्या तावदानामधील पट्टी, लहानसर अर्धगोलाकार मणी व रीळाकृतीचे नक्षीकाम, कुमुद, अशाच तऱ्हेच्या मोठ्या नक्षीकामास Torus म्हणतात. **Astragal plane** गोलची काढण्याचा रंधा.

Astragal : निमगोल नक्षी

**Astringent** कषाय, तुरट.

**Astroid** ताराभ.

**Astrologer** ज्योतिषी, फलज्योतिषी. **Astrology** ज्योतिष, ग्रहविद्या, फलज्योतिष, ज्योतिष विद्या. **Astrophysics** ज्योतिर्वास्तव.

**Astronaut**

**Astronomy** गणित ज्योतिष, खगोल ज्योतिष, ज्योतिःशास्त्र, खगोल विद्या, वेधशास्त्र, ज्योतिष्यक. **Astronomical mean Sun** वैषुव मध्यम सूर्य-रवि. **Astronomical meridian** वैषुव रेखांश. **Astronomical observation** ज्योतिर्वेध. **Astronomical year** प्रकाशवर्ष, ज्योतिवर्ष, प्रकाश एका सेकन्दात १,८६,००० मैल दूर जातो तेवढे अंतर. **Dynamical Astronomy** ज्योतिर्यामिक. **One astronomical unit** ज्योतिःशास्त्रीय एकक, भू. सू. प्रान्तर (९ कोटी ३० लक्ष मैल). (भू.=पृथ्वी, सू.=सूर्य). **Astronomer** ज्योतिर्विद, ज्योतिषिक.

**Astylar** अस्तंभ, दर्शनी स्तंभरहित दिसणारी इमारत.

**Ashvathara** देवळाच्या तळच्या थरातील अश्वनक्षी.

**Asylum** धर्मशाळा, अनाथगृह, दवाखाना आणि रहावयाचे ठिकाण. **–for old or descrepit animals** पांजरपोळ-ळा. **Lunatic asylum** वेड्यांचे इस्पितळ.

**Asymptote** अनन्तोपगा, स्पर्शान्तिका, उपगा, उपसंजिहाना, स्पर्शकल्परेषा, असंपातरेषा (वक्ररेषेच्या अधिकाधिक जवळ जाणारी परंतु कितीही वाढविली तरी तिला न मिळणारी रेषा). **–curve** असंपात वक्ररेषा.

**Asymmetrical** असमात्र, अप्रतिसम. **Asymmetry** असम्मितता, असमात्रता, असंमिति.

**Ate** इत. (Carbonate कर्बनित).

**Atelier** कलागृह.

**Atik** पंचदशपरशु.

**Ation** करण. (Oxidation प्राणीकरण.)

**At par** सममूल्य.

**At right angles** गुण्यात, काटकोनात, लंबरूप.

**At the extremity** अंत्यस्थ.

**Athermanous** उष्णतेला अनिर्गम्य, उष्णाभेद्य, उष्णता-विसर्जन. प्रतिबंधक, उष्मरोधी. **Athermancy** उष्णाभेद्यत्व, अधर्मवाहित्व.

**Atlantes** तुळईला दिलेले मनुष्याकृतीचे कोरीव खांब, कीचक.

**Atmolysis** वायुविश्लेषण.

**Atmometer** (दमट जागेतील) ओलसरपणा उडून जाण्याची गति दाखविणारे यंत्र.

**Atmosphere** वातावरण, पृथ्वीसभोवती ज्या वायूचे आवरण आहे तो वायु, वाय्वावरण, भूवायु, वायुचक्र, वातांबर, वायुमंडल, आवहमंडल. **–(of pressure)** वातांबर. **Atmospheric, atmospherical pressure** वातावरणाचा आकाशीय दाब, हवेचा दाब. **Atmospheric railway** वातावरणाच्या दाबाने चालणारी रूळगाडी.

**Atoll** आटोल, वलय, प्रवाल वलय.

**Atom** परमाणु. **Atomic** परमाणवीय. **–bomb** परमाणुध्वम्, **–energy** परमाणुशक्ति. **–heat** परमाणूष्णता-ताप. **–nucleus** परमाणु केंद्र, परमाणुगर्भ **–pile** परमाणुभट्टी. **reactor** परमाणुभट्टी, परमाणुशक्ति निर्माण करणारे यंत्र. **–structure** परमाणुघटित **–theory** परमाणुवाद. **–volume** परमाणुचे आकारमान. **–weight** परमाणुभार, परमाणुगुरुत्व ; हायड्रोजनच्या परमाणुचे वजन एक मानून इतर मौलांच्या परमाणुचे वजन यापेक्षा कितीपट आहे ते दाखविणाऱ्या आकड्यास परमाणुभार असे म्हणतात. परमाणवीय वस्तुमान. **Atomicity** परमाणुवत्ता. **Atomize** परमाणुरूप देणे.

**Atomizer** फवारा.

**Atrium** प्रवेशद्वार वगैरे सारखा, भोवतालचा भाग छप्पराने झाकलेले पण मधील चौक खुला असलेले क्रीडाभवन.

Atomizer : फवारा

**Atropin, Atropine** धत्तुरिन्.

**Attached column** भिंतीत अर्धा झाकलेला खांब.

**Attachment** जोडणी.

**Attic** कातरमाळा, कात्रा, शेवटचा माळा-मजला. शेवटच्या माळ्यावरची खोली, छदोधःस्थल. **–base** खालीवर बहिर्गोल व दोहोंमध्ये अंतर्गोल असलेला स्तंभाचा उथळा.

**Attract** आकर्षणे, आकर्षण करणे, आकर्षून घेणे. **Attracting groyne** धूपरोधक जालक, (प्रवाहाच्या विरुद्ध दिशेस बांधलेली भिंत). **Attractive forces** आकर्षण-आकर्षक शक्ति. **Attraction** ओढ, आकर्ष,

आकर्षण, आकर्षकत्व, आकृष्टि. **–of adhesion** संलग्नाकर्षण, पृष्ठाकर्षण. **–of cohesion** संसक्त्याकर्षण, स्नेहाकर्षकत्व. **–of currents** प्रवाहाकर्षण. **–of gravitation** गुरुत्वाकर्षकत्व, निकृष्टि. **Capillary attraction** केशाकर्षण. **Electric attraction** विद्युदाकर्षण, विकृष्टि. **Gravitational attraction** गुरुत्वाकर्षण. **Magnetic attraction** लोहाकर्षण, चुंबकाकर्षण, व्याकृष्टि, कर्षुकीय आकर्षण. **Universal attraction** सार्वत्रिकाकर्षण.

**Attrition test** खडी-रस्त्याच्या दगडांची (खडीची) वर्दळ-प्रतिकार क्षमता, काही खडे एका बंद पिंपात घालून ते पिंप ठराविक वेळेपर्यंत चक्राकार फिरविल्यानंतर झिजेमुळे दगडाची वजनात झालेली घट पाहून अजमावण्यात येते.

**Auburn** सोनसळा, पिंगट, पिंगळा, तांबुस-भुरका. **Bright auburn** गोरा-भुरका.

**Audibility** श्राव्यता. **Limits of audibility** श्राव्यकोटी. **Audience hall** सभामंडप. **Audio low frequency** कमी चंचलता, मंद श्रव्यावृत्ति. **Audition** श्रवण. **Auditorium** प्रेक्षकस्थान, प्रेक्षागृह, प्रेक्षागार, श्रोत्यांची बसण्याची जागा, सभाभवन, दर्शककक्ष.

**Augend** योजक.

**Auger, Augre** सळई, सामता, वेधन, बरमा, खोलवत (मोठ्या व खोल छिद्रांकरिता). **–bit** सामत्याचे पाते. **–gimlet** ऑगर व गिम्लेट या दोन्हींही हत्यारांचे माध्यम असे हत्यार. **Screw auger** गिरमिट.

Auger : बरमा

**Augite** (ओगाईट) काळ्या किंवा हिरव्या रंगाचे खनिज.

**Aureole, Aureola** चौकोनी, गोल किंवा अंडाकृति आकाराचे दिव्य तेजोमंडल-प्रभामंडल. हे धर्म संस्थापक आणि साधु यांचे देहासभोवती किंवा शिरासभोवती चित्रात काढतात. ग्रहणात दिसणारे प्रकाशमण्डल, अंतःकिरीट.

**Auriferous** सुवर्णमिश्रित-मय. **Auriga** प्रजापति. **Aurin** स्वर्गी.

**Aurora** मेरूज्योति, उद्योत, अरुणोदय. **–polaris** ध्रुवप्रकाश. **–australis** दक्षिण उद्योत. **–borealis** उत्तर उद्योत, उत्तरारुणप्रकाश, वैश्वानराग्नि.

**Aurous** स्वर्णस.

**Authorized or Designed** (Full supply discharge) आकल्पित-अधिकृत.

**Autobahns** आउटोबान; हिटलरने तयार केलेले मोटारीचे मार्ग. या सुंदर आणि प्रशस्त रस्त्यांवरून मोटारीखेरीज दुसरे कोणतेही वाहन जात नाही, किंवा क्रॉसिंग, गुरे अथवा माणसे आड येत नाहीत. यामुळे मोटारींना वेगाचे बंधन तर नसतेच, उलट त्या शंभर-सवाशे किंवा त्याहूनही जास्त वेगा जायला हव्या असतात. हे रस्ते कोणत्याही शहराच्यामध्र जात नाहीत व त्यांना कोणताही रस्ता किंवा रेल्वे आडवी ये नाही, कारण हे रस्ते त्यांच्या खालून तरी किंवा वरून त जातात; त्यामुळे अशा या रस्त्यांवर वाहनांच्या टक होण्याचाही संभव नसतो. या रस्त्यांचे जाळे सबंध जर्मनीभ प्रथम हिटलरने केले आणि मग त्यांची नक्कल इतर देशांत हो लागली.

**Autoclastic** स्वयंभग्न.

**Automatic** स्वयंग. स्वयंगामी स्वयंप्रेरित, आपोआप स्वयंचलित, स्वयंवह, आपोआप उघडणारे किंवा बंद होणा **–gate** आपोच्चलित द्वार. आपोआपी फाटक, स्व स्वोच्चलित–द्वार.

**Automobile** मोटार.

**Automorphism** स्वरूपता.

**Autosetlevel** झटपट लेव्हल घेण्याच्या सोईचा 'डम्पि लेव्हल' चा एक प्रकार. यात अंकित दण्ड वाचताना बुडबु मधोमध येण्याची आवश्यकता नसते व वेध घेताना चुका होण्यासारखी खास योजना केलेली असते.

**Autumnal equinox** शरत् संपात, तुलासंपात.

**Auxiliary** सहायक, पूरक, साहचकारी संख्या किंवा प दुय्यम. **–circle** उपवर्तुल, उपकुर्वाण वर्तुल, क्षेपवृ (लघुक्षेपवृत्त, बृहत्क्षेपवृत्त).

**Available supply** लभ्यांक-प्राप्य, उपलभ्य पुरवठा.

**Avalanche** हिमशिला, हिमावसरण, हिमानी-संप्रपा डोंगरावरून घसरत येणारा बर्फाचा लोट-खडप-धोंड, बर्फलो

**Avenue** दुतर्फा झाडे असलेला रस्ता, दुतर्फा झाडांची वा प्रवेशपथ-मार्ग.

**Average** सरासरी, मध्यममान, स्थूलप्रमाण. **Averag annual cost of repairs** संधारणार्थ वार्षिक परिव्य सं. वा. प. **Average monthly gauge reading or levels** मिहिरिक मध्यम उदाय अंक, मि. म. उदायां **Average supply, Open average** सरास पुरवठा.

**Aviary** पक्ष्यांचा शिकारखाना, पक्षिशाला, खुराडा.

**Avoirdupois weights** ग्रेट ब्रिटन व युनायटेड स्टे यांत रूढ असलेली साखर वगैरे तोलण्याची वजने, या वजन सोळा औंसांचा एक पौंड धरतात.

**Avulsion** विदारण, प्रदारण.

**A. W. G. (American wire gauge)** अमेरि तारमापक.

**Awl** आर, आरी, टोपण, टोपणे. **To bore with an awl** टोपणे, टोपसणे.

Awl: टोपण

**Awning** छत, चांदणी, आस्मानगिरी, चांदवा, वित **To cover with an awning** छतावण.

**Ax, axe** कुठार परशु, कुऱ्हाड, कुऱ्हाडी. **–head** कुऱ्हाडीचे लोखंडी टोपण. **–Stone** कुऱ्हाड पाजविण्याचा निशणा-लसणा. **Axed arch, Rough-cut arch** ताशीव विटांची बांधलेली कमान. **Axed work** परशूने घडलेल्या दगडांचे बांधकाम.

Axe : कुऱ्हाड

**Axial** अक्षीय. **Axile** अक्षासंबंधी, आसाकडील.

**Axiom** निवादक, प्रत्यक्षप्रमाण, स्वयंसिद्ध (तत्व, सत्य), गृहीत प्रमेय, स्वयंतथ्यं. **Axiomatical** स्वतःसिद्ध, प्रत्यक्षसिद्ध.

**Axis** (*pl.* Axes) अक्ष, आस, आख, कणा (Mathe.), प्रथमरेषा, निर्णय रेषा, मापनरेषा. **Axes, Isometric.** पहा Isometric. **Oblique axes.** पहा Oblique. **Rectangular axes.** पहा Rectangular. **Axial field** अक्षीय क्षेत्र. **–inclination** अक्षविक्षेप. **–load** अक्षभार. **–stress** अक्षीय प्रतिकार-विकारण. **–symmetry** अक्षसमप्रमाणता, रेषासंमिती. **–of abscissas** भुजाक्ष, कोटचान्तर मापनरेषा, कोटि-मापनरेषा. **–of the cone** शंक्वक्ष, शंकूचा अक्ष. **–of co-ordinate** मापनरेषा. **–of ordinates** निर्देशाक्ष, भुजांतर मापनरेषा, कोटिभुजा किंवा कोटिमापनरेषा. **–of projection** प्रक्षेपाक्ष. **–of reference** निर्देशिकाक्ष, प्रस्थान-अक्ष, संदर्भ-अक्ष. **–of rotation** वलनाक्ष. **–of symmetry** समात्रतेचा अक्ष, सममात्राक्ष. **–of X, Y, Z.** पहा X, Y, Z. **–carpenter** वाकस. **–neutral** अविकृत आंस. **–pick** टिकाव, पिकाव.

**Axle, Axle tree** अक्ष, आंस, आंख, कणा, अक्षल. **–box (of a cart)** खोबळा. **–load** अक्षभार, अक्षल भार. **–nut** कानखीळ, आसाची खीळ-खिटी. **–tree.** पहा Axle. **Transverse beam of axle** चाकपाटी.

**Axonometric projection** अधोदर्शन व त्या बरोबरच आकृतीतील कोनातून उभ्या रेषा काढून जमीन पातळीस ३० किंवा ४५ अंशांनी जाणाऱ्या तिरप्या रेषांनी दर्शनी देखावाही दाखविणाऱ्या प्रक्षेप नकाशाचा एक प्रकार.

**Ayacut** तलाव, कालवा वगैरे खालील नमूद दिलेल्या वहितीस असलेल्या जमिनीच्या क्षेत्रास दक्षिण हिंदुस्तानात ही संज्ञा आहे.

**Azimuth** क्षित्यंश, दिगंश, समकोन, समांश, दिक्-कोटचंश, खस्थ ज्योतीमधून जाणारे दृङ्मंडल आणि क्षितिजाचा उत्तर किंवा दक्षिण बिंदू यांमधील क्षितिजाचा भाग. **–circle, –vertical** दृङ्-मंडल, स्वस्तिक आणि खस्थ पदार्थ ह्यांतून जाणारे व क्षितिजावर लंबरूप असणारे वृत्त. **–compass** दिगंशहोका. **–dial** दिगंशमापक शंकुयंत्र. **Magnetic azimuth** लोहचुंबकासंबंधी याम्योत्तर वृत्त व पदार्थ उन्नतांशवृत्त यांनी केलेला क्षितिजावरचा चाप. **True azimuth** यथार्थ दिगंश. **Altazimuth** उन्नति दिगंशमापक यंत्र. **Co-azimuth** दिगंश, दिग्लंब.

**Azoic** प्राणीकोटीच्या पूर्वीचा (जसे Azoic rocks) जीवहीन, अजीवीय, जीवनपूर्वकाल.

**Azometer** नत्रमापक.

**Azonic, Archian** विशिष्ट कटिबंधाचा नव्हे असा, कोणत्याही कटिबंधाचा.

**Azote** नायट्रोजनचे पूर्वीचे नांव (नत्र), मृतवायु. **Azotise** अम्लवृण विशिष्ट करणे. **Azotite** नायट्रस ॲसिडचे लवण. **Azotous** नायट्रस ॲसिडासंबंधी.

**Azure** निळारंग, निरभ्र आकाश, आस्मानी नील, आकाशाच्या रंगाचा, निरभ्र, स्वच्छ. **Azurean Azurine** अस्मानी, नीलवर्ण, निळा. **Azurite** जांभळा कार्बानेट.

**Azygous** अयुग्म, दुसऱ्याबरोबर न जोडलेला, एकाकी, जोडीपैकी एक नाही असा.

# B

**B** ३०० ह्या आंकड्याकरिता हें अक्षर योजितात. **B̄** या अक्षरावर आडवी रेघ दिल्यास ३,००० असा त्याचा अर्थ होतो. **B flat** हा शब्द थट्टेने ढेकूण (Bug) ह्या अर्थी वापरतात.

**Babbitt-metal** एक प्रकारची मऊ मिश्र धातु. यंत्रात घर्षण कमी करण्याकरिता हिचा उपयोग करितात. ५० भाग कथील २ भाग अंज (Antimony) व १ भाग तांबे ही एकत्र मिसळून ही धातु तयार करतात. घ. फु. वजन ४४३ पौंड.

**Babel** उंच इमारत, उंच मनोरा.

**Baching plant** प्रमाण नियामक.

**Back** पाठ, पिछाडी, मागील भाग, पृष्ठ, पृष्ठभाग-देश. **–door** परसदार, परसदार, मागीलदार. **–elevation** पृष्ठनिदर्शन, पिछाडी देखावा, पश्चाद्दर्शन. **–(fill) filing** खणून काढलेल्या जागी केलेला नवीन भराव, नवीन भराव करणे, पार्श्वभरण. **–flap hinge** झडपा पातळ असल्यास त्याच्या पृष्ठास बसविण्याची बिजागर. **–flow, –water** कोंडपाणी, उलट जलप्रवाह, धरून किंवा कोंडून ठेवलेले पाणी, खाडीचे पाणी, धरणाचे पाणी, (आगबोटीच्या पंख्याने) मागे कापत जाणारे पाणी. **–water line** प्रतीप रेखा. **–ground** पार्श्वभूमि, पार्श्वभाग, मागील जागा, गुप्तस्थळ, (चित्र खुलण्याकरिता केलेली) पृष्ठभूमिका, परभाग. **–iron.** पहा Cap iron. **–lash** सुटी हालचाल. **–plate** एखाद्या वस्तूच्या पाठीवरची तबकडी-झांकण. **–plumbing pressure** बाहेरच्या हवेच्या दाबापेक्षा नळातील हवेचा वाढता दाब. **–pressure** इंजिनाच्या दट्टयाच्या गतीच्या उलट दाब.

–**saw** ज्या करवतीच्या पात्याला ते वाकू नये म्हणून धातुमय पाठ दिलेली असते अशी करवत ; न वाकत्या पाठीची करवत. –**sawing** स्पर्शिका पद्धत (अरकसण्याची). –**set,** –**wash** उलट प्रवाह, परत प्रवाह, नैसर्गिक प्रवाहाच्या विरुद्ध गति. –**settlement** मागून लागवडीस आणलेली जमीन. –**sight** पश्चावलोकन, (दुर्बिण पहाणीतील) मागील दृश्य. –**stairs** आड जिना, चोर जिना, मागील जिना. –**water curve** पराचीन जल-पृष्ठरेखाटी. –**yard** परडे, मागले आंगण, परसूं, परूस. **Backing** पुस्ती, दुमाला, पुरवणी, पार्श्वग, पृष्ठाधान.

**Bacterium** (*pl.* **Bacteria**) सूक्ष्मजंतु. **Bacteriology** सूक्ष्मजंतु शास्त्र. **Bacteriologist** जंतुशास्त्रवेत्ता.

**Bad conductor** दुर्वाहक.

**Bada** देवळाच्या माथ्यापर्यंतचा घनाकृति भाग.

**Badger plane** इरापरंधा, खोबणीच्या किंवा खोलगट भागाच्या कोपऱ्यातल्या कांटेकोर कामासाठी खास हा रंधा उपयोगाचा आहे.

**Baffle** वेगभंजक, बाधित्र. –**tooth** दात्र, बाधादन्त. –**wall** तोयवेग आवरणारी भित–पडदी; पहा Curtain wall.

**Bagnio** हमामखाना, स्नानागार, नहाणीघर, तुरुंग.

**Bail, Bale** उपसणे, उसपणे, उसपा-उसपणी करणे. मेढेकोट, किल्ल्याची बाहेरील तटबंदी, तबेल्यांतील दोन घोड्यांमधील फळी. **Bailer** पाणी उपसणारा मनुष्य, पाणी उपसण्याचे भांडे.

**Bailey** दुर्ग प्रांगण, किल्ल्याची बाहेरची भिंत, किल्ला व ही भिंत यांमधील आंगण. (**The old Bailey in London** लंडन मधील मुख्य फौजदारी कोर्ट किंवा तुरूंग) –**bridge** 'सर डोनाल्ड बेली' यांनी शोध लावलेल्या या पुलाचा उपयोग प्रथम १९४२-४३ साली उत्तर आफ्रिकेतल्या लढाईत केला गेला. पूर्वरचित लोखंडी बहाले व वरची मांडणी यांचे भाग नेण्यास व उभारण्यास सोईचे असल्याने हा झटपट उभारता येतो. अलिकडेच १९५८ साली महाराष्ट्रातील कुलाबा जिल्ह्यात 'मुंबई-गोवा' रस्त्यावर 'निगडे' येथे व १९६० साली 'मुंबई-पुणे' रस्त्यावर पनवेल नजीक 'काळुंद्री' नदीवरील जुने पूल वाहून गेल्यावर हे पूल उभारल्याने केवढा उपयोग झाला हे प्रसिद्धच आहे.

**Bajri, Bujri** खडीची भुकटी-कच, रेती, वाळू, सिकता.

**Baker's dozen** तेरा. **Baking** मुद्दाम उष्णता देऊन (रंग) सुकविणे. –**heat** भाजण्यापुरती उष्णता.

**Balance** तोलनी, तोलकांटा, ताजवा, फिरकी, तराजू, कांटा, तागडी, तुला, सन्तुलन, शेष. **False balance** दीडदांडी, चोरकांटा. **Inexactness of balance** तट. **Large balance** तग. **Large fixed balance** घट. **Spring balance** ताणकांटा, दाबकांटा. –**bridge.** पहा Bascule Bridge. –**gate** (मधल्या उभ्या दांड्यावर बसविलेले) तुलाद्वार. नाल्यांत शिरत्या प्रवाहाच्या दाबाने झडपा खुलणारे व बाहेर वाहून जाणाऱ्या प्रवाहाच्या दाबाने झडपा बंद होणारे असे दार. –**weight** तोल सांभाळणारे वजन. –**wheel** तोलचक्र, नियामक चक्र. –**of perfect accuracy** धर्माचा कांटा (**For weighing disputed quantities**). **Balancing column** तोलकस्तंभ. –**room** तुलनालय. –**scale** तोलकांटा. –**tank** उपनिधि, उपतटाक. **Balanced** तुलित, संतुलित. –**steps.** पहा Dancing steps. **Balancer** तोलक.

**Balcony** सज्जा, छज्जा, खिडकीच्या पुढची कठडेदार गलोरी (विशेषत: वरच्या मजल्यांची). **Balconet** ठेंगण्या नक्षीदार कठड्याचा लहान सज्जा.

Balcony : सज्जा

**Baldachin, Baldachino, Baldaquin, Baudekin, Bawdkin** समाधी वरील छत्री.

**Bali-mandapa** पुढचा मंडप (दिवाणखाना).

**Baling press machinery** गठडी बांधण्याचा सांचा.

**Balistics** उत्क्षेप-विज्ञान. **Balistic** उत्क्षेपी.

**Balistraria** (शत्रूवर मारा करण्याकरिता ठेवलेली) तटबंदीतील जंगी.

**Balize** समुद्राच्या मर्यादेची-सीमेची दांडी किंवा इतर खूण.

**Balk, Bauk, Baulk** खावडे, वरळ, भांगण, दोन शेतामधील हद्दीचा बांध, बिन नांगरलेली जागा, लाकडाचे बहाल, धुराड्यातील किंवा भट्टीतील आडवे बहाल, लाकडाचा मोठा ओंडा. कैचीच्या पायाचे बहाल (**Tie Beam**). पहा Baulk.

**Ball** बोंड. –**bearing** गुलिकाधार, गोळी बैठक; यंत्रातील फिरता भाग सुट्या पोलादी गोळ्यांवर फिरण्यास लावून घर्षण कमी करण्याचे एक साधन. –**cock** गोलतोटी, टांकी भरली म्हणजे आपोआप बंद होणारी तोटी. –**flower** गॉथिक शिल्पातील वाटोळ्या फुलांत चेंडू ठेवल्यासारखी नक्षी. –**mill** पदार्थाचे चूर्ण करण्याचे लोखंडी किंवा दगडी गोळे आंत भरुन चक्राकार फिरविण्यासारखे पिंप.–**pane hammer.** पहा hammer. –**peen** हातोडीच्या टोकावरील गोल माथा. –**and socket joint** उलूखल-संधि, गोलविवर्त सांधा. **Balling machine** सुतळीच्या गुंड्या बनविण्याचे यंत्र.

**Ballast** खडी (रेल्वेवरील), विमानांतील रेती (विमानाचे वजन कमी करावयाचे असल्यास ती रेती खाली टाकतात). घ. फू. वजन ९० ते १०६ पौंड. **Ballasting** खडी वगैरे स्थिर करणारे पदार्थ, (गलबताचा तळ पाण्यात

पाहिजे तेवढा बुडावा म्हणून रेती, दगड, लोखंड वगैरेचे त्यांत घातलेले वजन, निरीम, निलीम, भार.
**Ballies** वासे.
**Ballista, Balista** प्राचीन लोकांचे वेढ्यातल्या स्थलावर दगड वगैरे फेकण्याचे एक यंत्र, अश्मक्षेपन यंत्र, उल्हाट यंत्र, गरनाळ.
**Balloon** आकाशयान. – **basket.** पहा cowl. –**frame** खालपासून छप्परापर्यंत असा सलग खांबांचा सांगाडा.
**Ballust** निरीम.
**Balneary** नहाणघर, स्नानागार.
**Balneology** कोणत्या खनिज द्रव्याच्या झऱ्याचे स्नान केले असता प्रकृतीवर काय परिणाम होतो ह्याचा विचार केलेले स्नान शास्त्र.
**Baluster, Balister, Ballister, Banister** कठड्यास आधार देणारा लहान खांब, गराद किंवा स्तंभ (*pl.* **Balustrade**). **Balustrade** नक्षीदार चपट्या गरादांचा कठडा, कठरा, कठंजन.

Balustrade : कठडा
(अ) Baluster गराद

**Bamboo** कळक, कळंक, टोंकर, बांबू, वंश, वांसा, वेळू, कीचक, माणगारा, माणगा, बांसडा, भालेकाठी. **-battens, split bamboos** कामट्या, चिपाट, कांबीट. –**camphor** वंशलोचन. –**crook** डांग, डांगकाठी. –**matting** तट्ट्या. —**pole or stick** वेळकाठी. –**pole with ropes for the conveyance of loads** नवघण. -**of small kind** चिवा, चिंवा. **Clump of bamboo of small kind** चिवार. **Bamboo of long and thick kind** माणगा, माणा. **Bamboo of long and thin kind** टोकर, टोंकर. **A thin slip of bamboo** बेळ. **Frame work of light slips of bamboo** भाळी, साटी. **Outer strip from slips of bamboo** पाठखांब, पाठबीळ. **Piece of bit of a bamboo** कळकूट, बेळकट–कूट. **Screen made of split bamboos** चिकाचा पडदा. **Slip or strip of a bamboo** कांब, कांबिट, सरी, सारण, चिंब, चिंबट.
**Bamli** आवार, चौक.
**Band** (दरवाजाची लांब लोखंडी) पट्टी, पट्टा, कडे, बंद, सांखळी, खंडित. – **chain** पोलादी टेप. – **iron** पट्टी लोखंड. – **room** नगारखाना. – **saw** पट्याची करवत. -**stand** सार्वजनिक वाद्यस्थान. – **wheel** ज्यावर पट्टा फिरतो ते चाक. – **and hook hinge.** पहा strap hinge. **Banded column** पट्टेरी,-भोंवती पट्टे असलेला-पट्टेदार खांब. **Banding** रश्शी, (चातीला लावलेली). – **machine** रश्शी बनविण्याचे यंत्र. **Bandlet, Bandelet** खांबाभोवतालची पट्टीदार नक्षी.
**Bandala** ज्यापासून चांगले दोरखंड करता येईल अशा मॅनिला झाडाचा काथ्या.
**Banderol, Banderole** शिल्पप्रसाराच्या काळात प्रचारातले पट्टेदार कोरीव लेख असलेल्या इमारती.
**Banister** कठडा, डाळिंबाच्या फुलासारखी नक्षीदार चपटी गराद.
**Bank** किनारा, तीर, थड, थडी, तट, बांध, बंधारा, भराव, काठ, दरड. बांधणे, बांध घालणे, ढीग-रास करणे. –**raised around trees** पार. –**deposit (river)** तटनिक्षेप. **(on) Both Banks** दुथडी. **Farther or other bank** पैलथड, पैलथडी, पैलतीर-काठ. **From bank to bank** कोळशाच्या खाणीत उतरणारा मनुष्य वरून खाली जाऊन वर येईपर्यंतचा काल. **Full of banks or ridges** दरडवट. **High or steep bank** डगर, दरड, धस, धसरड. **Hither or near bank** ऐलथड, ऐलथडी, ऐलतीर. **Little bank to stop water** ताल, पाळ. **Shelf, shallow, flat bank** भाट, भाटी, लाग. **Thither & farther or opposite bank** पैल, पैलतीर, पैलथडी-ड, पैलाड, पलतड, पारावार. –**side** नदीची उतरती कड. –**sided** आत उतरत्या बाजूचे (जहाज) (या उलट **wall sided**). **Banks' webbing** पिळदार (लोखंडी) पट्टीची जाळी. **Banker** एक जातीचा पडाव, नाला खणणारा, गवंडी लोक ज्या दगडी बाकावर दगड घडतात ते बाक, कुंभाराचा किंवा पाथरवटाचा काम करण्याचा ओटा. **Banksman** खाणीच्या तोंडाशी देखरेख करणारा.
**Banquet, Banquette** तटाच्या आंतील दरड (दरडीवर उभे राहून तटावरून गोळीबार सोडण्याकरता). पुलाच्या दोन्हीं बाजूंचा उंच पायरस्ता. खिडकीच्या आंतील कठडा असलेली बसण्याजोगी जागा. **Banqueting house** मिष्टान्न-पानगृह.
**Baoli or wav** बावडी, वाव, गुजराथ किंवा पश्चिम हिंदुस्तानांतील पायऱ्यांची विहीर.
**Baptistery** जलसंस्कार शाला-स्थान, चर्चमधील बाप्तिस्मा करण्याची जागा किंवा स्वतंत्र इमारत.
**Bar** गज, गजी, अडवट, अडवण, गातडी, अडू, अट, गवा-व्हा -ण-णी, कांब, अगळ, अडिबा, खीळ, खिळी, दण्ड, दांडा, गराद, लाट (हा शब्द **cylindrical bar** ह्या अर्थी वापरतात, जसे : घाण्याची लाट). (कैद्यास उभा करण्याचा) पिंजरा, कठड्याचा पिंजरा, न्यायासनासमोरची जागा, रेषा, गुत्त्यात किंवा फराळाचे दुकानात गिऱ्हाइकांकरिता केलेली कठड्याची जागा, अरुंद पण फार लांब अशी पट्टी. अडसर-अर्गळ-अगळ-आडिबा घालणे-लावणे-सारणे किंवा घालून बंद करणे. **Milk bar** दूधकेंद्र. **Bar above** उद्रेषा. **Bar below** अवरेषा. **Bar of capstan** अढे, मूठ. **Bars claw** सिलिपाटावरील (वाकविलेल्या माथ्याचे) खिळे उपटण्याचा गेळ. **Bar of door** अडसर, अर्गला, अर्ग (ग) ळ, आडगळ, आडा, खिळी, अडणा, खीळ,

अड्डू, आडिंबा, अट, आड, अटक, अडण-णे. –graph उभ्या जाड रेघांचा प्रगतिदर्शक नकाशा. **Bar (in harbour)** दांडा, अळदांडा, नस्त, दांडी, बांध, (नदीच्या मुखाशी जमलेला) चिखलाचा बांध, सैकतक, मृत्तिका बंध. **Bar iron, iron bar** सळई-लोखंड, पहार, लोखंडाची कांब, लोखंडी गज–शीग, पारई (य). **–iron set round with rings** गोरखचाळा, गोरखसाखळी. **–of metal** लगड, कांब. **–magnet** पट्टी चुंबक, काण्ड-कर्षक. **Bars of window railing & C.** कठडा, गज, गराडा, गराज, गराद-दा. **Barred** उद्रेखित, अवरेखित. **–door** गजांचा दरवाजा. **–wood** आफ्रिकेतून आयात होणाऱ्या रंगकामाच्या तांबडया लाकडाच्या काठ्या.

**Baradari** बाराखांबी, द्वादशस्तंभी देहली.

**Barajhanji** देवळाच्या द्वाराचे नक्षीकाम (ओरिसा).

**Barbacan, Barbican** (प्रवेशद्वार) रक्षक बुरुज, नगर किंवा किल्ला यांचे रक्षणार्थ बांधलेला पहारे बसण्याचा बुरूज, नगर-किल्ला-रक्षक बुरुज, (किल्ल्यांतून शत्रूवर गोळीबार सोडण्याकरिता) तटातील खिड.

**Barbadoe's tar** बार्बाडोझचे डामर.

**Barbed wire** (कुंपणाची) कांटेरी तार, कांटेरी विणीची तार.

**Barber's pole** न्हाव्याचे निशाण (तांबडया काळ्या पट्ट्यांचे असते; ह्यावरून न्हावी येथे रहातो असे कळते).

**Barbecue** खुला चूलकट्टा.

**Barbette** किल्यातील जड तोफांच्या बैठकीसाठी केलेला मातीचा चौथरा.

**Barbican.** पहा Barbacan.

**Barge** मचवा, क्रीडानौका, बरकीण, पडाव, बाऱ्यां, सपाट बुडाचे इंजिन असलेले लोखंडी मालवाहू जहाज. **–man** क्रीडानौकेवरील खलाशांचा मुख्य. **–master** क्रीडानौकेचा मालक. **–board** कणेरपान, चांदईची दर्शन पट्टी (पाऊस आंत येऊ नये म्हणून व वासे झाकून टाकण्याकरिता चांदईच्या कड्याने लावलेला फलाट किंवा फळी). **–course** चांदईकडील कवलांची शेवटची रांग, वाशांच्या पुढे आलेली कौलांची पाळी.

Barge board : कणेरपान

**Barium** भारद. **–plaster** रेती-सीमेंट बरोबरच बेरियमसॉल्ट वापरून इस्पितळातील 'क्ष' किरणांच्या खोल्यांच्या भिंतींना गिलावा करतात. 'क्ष' किरणांचे धोकेबाज परावर्तन यामुळे होत नाही.

**Bark, Barque** लहान जहाज, बारकस. **Barker's Mill** डॉ. बार्करने अठराव्या शतकात शोध लावलेली पाणचक्की. **Bark pockets** (झाडाच्या) लाकडात झाकली गेलेली साल.

**Barley** इंचाचा तिसरा हिस्सा, आठ जवाचे दाणे एक बाजूस एक ठेवून होणारी लांबी :—अंगुल. **Exceeding by a barley-corn** जवा आगळा.

**Barmkin** किल्ल्याचा तट, किल्लेकोट.

**Barn** कोठार, मागर, कोठारात साठविणे. **–yard** कोठारा-भोवतालचा कूड.

**Barne's Formula** नळांडीतील प्रवाहाचा वेग काढण्याचे 'बार्ने सूत्र'.

**Barogram** भारालेख, दमनालेख. **Barograph, Barometrograph** वायुदमनलेखनी, भारलेखक, स्वयं-लेखक, भारमापक, भारमापकाने दाखविलेला हवेचा दाब. **Barometer** वायुभारमापक यंत्र, (हवेचा) भार-दाब मोजण्याचे यंत्र, वातमान यंत्र, वायुगुरुत्वमापक यंत्र, 'सेई-उ-केई;' 'सूर्यप्रकाश-पाऊस-गणित' या अर्थाचा जपानी शब्द. **Aneroid barometer** अनार्द्र–निर्द्रव-अप्रवाही भारमापक यंत्र. **Cistern barometer** कुंडभार-मापक, हौदभारमापक. **Marine barometer** सामुद्रीय भारमापक यंत्र. **Mountain barometer** पर्वतीय भारमापक यंत्र (उंची मोजण्याचे); हे यंत्र प्रवासात बाळगण्यासारखे असून त्याला आधारासाठी तिवई असते व याची मापनसूची (scale) बरीच लांब असते. **Siphon barometer** भारमापक वांकडी नळी. ही नळी आकड्या सारखी असून तिचे लंबाग्र बंद असते. लंब भागात पारा असतो व त्याची उंची वातावरणाचा दाब दाखविते. **Weight barometer** गुरुत्वभारमापक. **Wheel barometer** चक्राधार-चक्रीभारमापक. **Barometry** भारमिति, भारमापनशास्त्र.

Barometer : वायुभारमापक

**Barometric, Barometrical** भा. मा. ने दाखविलेला भा. मापकी, भा. मापकीय, भा. मापकाचा. **–observation** भारमापकी माप. **–pressure** भा. मापकाने दाखविलेला हवेचा दाब.

**Baroque** अठराव्या शतकारंभी पुरोगामी शिल्पज्ञांनी जी तऱ्हेवाईक संकेत झुगारून शिल्पाला जे नवीन वळण दिले ती 'बारोक' शैली.

**Baroscope** (हवेचे) भारदर्शक. **Baroscopic** भारदर्शक संबंधी, भारदर्शकाने दाखविलेला.

**Barrack** बराक, लष्करी शिपायांची चाळ, अलंग, थोडे दिवस राहण्याकरिता बांधलेले घर.

**Barrage, Barrage fixe** बराज, बन्धराज, कृत्रिम रीतीने पाणी अडवून त्याचा उपयोग क्षेत्रमापन, जलवैजिक किंवा नौकानयनाकडे करण्यासाठी बांधलेला कायमचा बंधारा.

**Barrel** पिप, मेपटे, ३११⁄२ गॅलन. **–bolt** टावर बोल्ट. **–bulk** पांच घनफुटांचे माप. **–drain** गोलमोरी, पिंपाकृति मोरी. **–nipple** दोन्ही टोकास पेच पाडलेले व मधील साधा भाग असलेले निपल. **–vault** लंबडेरा, दंडगोल डेरेदार छप्पर. **Barrelling (of road surface)** (रस्त्याच्या पृष्ठभागास) इराप बांधणे, मगरी बांधणे.

**Barren** भुरकड.

**Barricade, Barricader, Barrcado** मेढेबंदी, मेढेकोट, मेढा, अडकूट, मार्गावरोधक रचना. **Barrier** कुंपण, कुडण, आडकाठी, अडकूट, प्रतिबंध, हद्द, सरहद्द, सरहद्दीवरचा किल्ला, कडमहालचा गांव किल्ला, कुंपण घालणे.

**Barring** गज किंवा कांबी लावणे. **–engine** मोठ्या बैठ्या इंजिनास काम पडेल तेव्हा हळूहळू फिरविणारे लहान एंजिन. वरमव्हीलने मोठ्या इंजिनच्या चाकाला चालविणारे धाकटे इंजिन. **To bar an engine** पहार मारणे, हळूहळू एक एक दाता पुढे लोटून इंजिन फिरविणे.

**Barrow, hand** मंज्या. **wheel barrow** लहान एकचाकी हलकी हातगाडी.

Barrow wheel : हातगाडी (एकचाकी)

**Barter** विनिमय, अदलाबदल.

**Bartisan, Bartizan** मनोऱ्याच्या माथ्यावरील (शिकार करण्यास सोईचा) झुकावदार सज्जा.

**Barycentric** गुरुत्वाकर्षण विषयक.

**Barysphere** भूगर्भ.

**Baryte** भारद पाषाण, बराइट, खनिज घ. फु. वजन २८१ पौन्ड.

**Basal, Basilar, Basilary** तळसर, (दगडाचा), तळाचा, बुडाचा, बैठकीचा.

**Basalt** असिताश्म, लोखंडासारख्या काळसर रंगाचा दगड. हा भूगर्भातून व ज्वालामुखी पर्वतातून बाहेर पडणाऱ्या उष्णप्रवाही पदार्थापासून उत्पन्न होतो. घ. फु. वजन १८४ पौंड. बेसोल्ट पाषाणाच्या रंगाच्या मातीची भांडी. कार, कारीचा दगड, काळा खडक.

**Bascule bridge** *or* **counterpoise bridge** *or* **Balance bridge** उघडझाप पूल, समतोलन पूल, एका किंवा दोन्ही अंगास असलेल्या आडव्या आसावर किंवा बिजागऱ्यांवर उभ्या पातळीत समतोलनाच्या तत्त्वावर नदीवरील भाग उंच केल्यावर खालून जहाजे जाण्यासारखा बांधलेला पूल, वितोलोत्तार पूल. लंडन येथील टावर ब्रिज या प्रकारचा आहे.

**Base (Consists:–Torus, Plinth)** आधारांक, आधारसंख्या, मूळ संख्या. लढाई सुरू करण्यास सोईस्कर असा तळ, (एखाद्या वस्तूचा) मुख्य घटक, विधारक भस्म. मंदक्षार, स्थिरद्रव्य, उथळा, उथळी तळ, पाया, बूड, बैठक, खुर्ची, तळसरी (नक्षीदार असेल तर खुर्ची, नुसती दगडाची असेल तर तळसरी) क्षिति, भूमी, जमिनीवरच्या बांधकामाचा अगदी खालचा थर, हिणाचा, हिणकस, हिणवट, हिणकट (धातु). अधिष्ठान, उपादान, प्रधानतत्त्व. भूमिका, पाया (Geom.) विकरण (calculus) भू. पायसर. कुंभी. **–angles** तलस्थकोन, पादकोन. **–Court** घराच्या मागील अंगण. नोकर रहाण्याचे (किल्याचे बाहेरील) सखल अंगण. **–exchange capacity** धायविनिमय सामर्थ्य. **–exchange reaction** धायविनिमय विक्रिया. **–line** (मोजणीची) आधाररेषा, प्राधार (रेषा), पायाची रेषा, अधिकरण रेषा, आदिरेषा, मूलरेषा, भूमिरेखा, तळची रेषा. **–load** विशिष्ट कालातले कमीत कमी वजन-भार. **–of logarithm** निधान, आधारांक (लाग). **–metal** (किंमती नव्हे अशी) साधी धातु. **–moulding** तळ तक्त्यावरील नक्षीकाम–ओतकाम. **–period, Crop-period, –days** सस्यावधी, सस्यक, खरीपी पीक काढण्यास पंजाबात १८३ व रबी पिकास १८२ दिवस लागतात. मुंबई लगतच्या महाराष्ट्र भागात १५ फेब्रु. ते १४ जून, १५ जून ते १४ ऑक्टोबर, १५ ऑक्टोबर ते १४ फेब्रु. असे पिकांचे तीन हंगाम आहेत. **–plate** जडयंत्राची तळबैठक. **–point** पाद बिन्दु. **At the base** जमिनीच्या पातळीत ; उभ्या झाडाच्या व्यासाचे माप घेतांना ते वरील किंवा 'बुंधाच्या' किंवा छाती इतक्या उंचीवरच्या व्यासाचे याचा स्पष्ट उल्लेख करावा लागतो.

**Basement (floor)** तळघर, तळ मजला, खालचा मजला. **Basement** आधारकाम, पायावरचे दगड कामाचा काही भाग, जमिनीच्या सपाटीच्या खाली असणारा तळचा भाग (भुयार नव्हे).

**Basic** मूळ, समाक्षारीय, पदधर्मी, विधारकधर्मी. **–brick** क्षारीय ईट-वीट. **–rock** अल्क. शैलिक अम्ल कमी असलेले खडक, अल्पसिकत.

**Basilica** न्याय मंदिर, रोमन काळातील अशा पुष्कळशा न्याय मंदिरांचे मागाहून ख्रिस्ती चर्चमध्ये रूपांतर केले गेले.

**Basility** भस्मसंयोगशक्ति. **Basicity** भास्मिकता, विधारकता.

**Basin** द्रोणी, वाटी, हौद, कुंड, अळे (पाळे, ओंडण, घोळ, दोन टेकडयांमधील खिंडीला हे शब्द आहेत). थडी (जसे गंग-थडी), नदीचा पाणवठा, ज्या प्रदेशातून एखादी नदी किंवा तिला मिळणाऱ्या नद्या वाहतात तो प्रदेश, नदीच्या किंवा समुद्राच्या कांठची गोदी, वाटिका, निश्चारक्षेत्र. **Coal basin** कोळशाचे थराचा प्रदेश. **Basin** निश्चार क्षेत्र. **–irrigation** वेशन्त-पायन, नैसर्गिक किंवा कृत्रिम उंचवटयांनी वेढिलेल्या जमिनीस भरपूर पाणी देऊन ते सुकल्यावर बी पेरणी करण्याची पद्धत.

**Basis** (*pl.* **Bases**) पाया, तळ, बैठक, बूड, मूलाधार अधिकरण, मूल (**Origin**), मूळचा सुरुवातीचा पाया. **Exchangable basis** विनिमय धाय.

**Basket handled arch** तीन मध्य बिंदूंची-ठेंगण्या माथ्याची कमान. **Basket system** मैला वाहून नेण्याची पद्धत, विट्पिटक पद्धति, पिटक पद्धति, शुल्कापोह पद्धति.

**Bas, Bass relief,** बाह्यगोल उठावाचे नकसकाम–शिल्पकाम, ज्या शिल्पकामात योग्य प्रमाणाच्या निम्मेपेक्षा कमी भागवर आलेला असतो त्यास हा शब्द लावतात. **Bass wood** अमेरिकन लिंबाचे झाड किंवा त्याचे लाकूड.

**Bastard ashlar** खांडकीचे माठीव संगीन काम. **Bastard cut** एक प्रकारच्या कानशीच्या फुलाची जात. **Bastard stucco** गिलाव्याचा (रंग देण्याजोगा) शेवटचा हात. **Bastard tuck pointing** पट्टी पॉइंटिंग, पट्टीची दर्जगिरी.

**Basti** देऊळ (कानडी).

**Bastile, Bastille** तुरुंग, तटबंदी, बुरूज, किल्ला. पारीस मधला इ. स. १७८९ तील राज्यक्रांतीत क्रांतिकारकांनी पाडून टाकलेला (पूर्वी तुरुंगासारखा उपयोग होत असलेला) किल्ला. **Bastion** बुरूज, हुडा. **Of four bastions** चौबुरजी.

**Bat, Brick bat** विटेचा तुकडा, विटकुर, अतिशय पातळ थराच्या रूपात असणारी एक प्रकारची कुंभारमाती.

**Batch** घाणा, एकाच दिवसांत एकाच वेळी एकाच तऱ्हेच्या मालापासून बनविलेल्या फर्द फळचा. **Batching** वर्गीकरण. **Batching-plant** प्रमाण नियामक, स्वमापी संयंत्र.

**Batement light** उभ्या बाह्यांची पण जिन्याच्या चढाप्रमाणे चढते तळ असलेली खिडकी, –अर्ध खिडकी.

**Bath** स्नानागार, स्नानकुंड, गुसलखाना, हमामखाना, औषधीस्नान, जलस्नान, ज्यू लोकांचे सुमारे सहा गॅलन पातळ पदार्थाचे माप. आवार, आवरण, द्रावण ठेवण्याचे पात्र, निमज्जन पात्र, द्रावणपात्र. **–brick** बाथवीट (सुऱ्या, कातऱ्या वगैरे साफ करण्याची वीट). **–chair** (जाया झालेल्या किंवा हैराण मनुष्याकरिता) एक माणूस बसविण्याची लहानशी गाडी. **–room** न्हाणीघर, नहाणी, नह्यणघर, स्नानगृह, स्नानी, स्नपनी. **Bathing box** स्नान करण्यापूर्वी कपडे काढून ठेवण्याची व नंतर ते घालण्याची खोली, –पेटी. **Bathing house** हमामखाना, स्नानागार. **Bathing machine** पाण्यात नेण्याजोगी झाकलेली गाडी, (हीत आंघोळ करण्यापूर्वी लोक कपडे काढतात व नंतर ते घालतात). **Bathing metal** जस्त व तांबे यांचे समान मिश्रण. **Bathing stone** पाथरी. **Fire place for bathing** पाणचूल. **Mortared spot for Bathing** नाहणी, मोरी, मोहरी. **Turkish bath** तुर्की पद्धतीच्या स्नानाची जागा. **Bathometer** जलवेधमापन यंत्र, जलवेधयंत्र, गाढत्वमापक, गळाशिवाय तळ मोजण्याचे कमानीच्या तराजूसारखे यंत्र. **Bathymetry** (समुद्राची) गाढत्वमापन (विद्या), जलवेध विद्या.

**Bathyscaph** (प्रो. पिकार्डने तयार केलेले) पाणबुडे बलून.

**Batten** (सागवानाची) रीफ, दांडली, पट्टी (रुंदी किंवा जाडी यांची मापे पांच सें.मि. किंवा दोन इंचापेक्षा जास्त नाहीत अशी) फणीवरील हुत्याचे लाकूड, चिरकांब, चीप. चिपेने –पट्टीने सांधणे,–जोडणे. **–board** तीन इंची रिफा जोडून केलेला गाभा व वरखाली पातळशा सलंग पापुद्रेवजा फळ्या बसवून केलेला फळा. **Battened door** आडव्या दांडक्यांनी जोडलेल्या रिपांचा दरवाजा.

**Batter** उतार, उतरण, ढाळ (पाणी किंवा भरावालगतच्या भिंतींना मजबुतीकरिता दिलेला) व्याहृत. **–board** उभ्या पृष्ठास इष्ट ढाळ देण्याच्या सोईचा फर्मा. **Battered** खोमललेला, चेचका, खोचे पडलेला–पाडलेला. **Battering ram** आघातांनी भिंत पाडण्याचे यंत्र, किल्ला फोडण्याचे यंत्र, लोलगदा यंत्र (हें चालवायला शंभर माणसें लागतात). **To batter** तिंबणे, मातीचा चिखल-गारा करणे.

**Battery** भाळका, विजेरी, बातेरी, मोर्चाचे सामान व माणसे, संरक्षक तट [गोलंदाज ह्याच्या आड उभे राहून ह्या तटाच्या छिद्रातून (जंग्यातून) तोफा सोडतात]. धमामा, दमदमा, मोर्चा लावण्याची उंच जागा, सजातीय वस्तुमाला, (जसे A. B. of boilers). 'देन–ची' : वीज–तळे या अर्थाचा जपानी शब्द. **–of cells, Electric battery** विद्युत्घट, बातेरी, विजेरी, विद्युन्माला, विद्युद्घटमाला. **Floating battery** तोफेची लढाऊ जहाजे (*pl.*) तरतामोर्चा, तराफ्यांचा तोफखाना. **Gun battery** तटाच्या जंगीत बसविलेली तयार बंदुक.

**Battlement** जंग्यांची खाचेदार भिंत, जंगी, तटांच्या दोन जंग्यांतील (छिद्रातील) भरीव भाग. **Battle-ship** युद्धनौका. **Battle axe** परशु, फरस–शा, फरशी.

**Baulk** ६″ × ६″ पेक्षा मोठ्या आकाराचे चिरीव चौरस लाकूड.

**Bauxite, Beauxite** कच्चे ॲल्युमिनिअम ; घ. फु. वजन १५९ पौंड. **–bricks** भटटीच्या विटा.

**Bawn** गोठ्याचे कुपण, घराभोवतालची रक्षक भिंत.

**Bay** उपसागर, खण, गाळा, एखाद्या इमारतीचा खणासारखा

Bay : मळणा-पेटी

भाग, खांबांनी किंवा इतर कोणत्याहि कारणांनी झालेल भिंतीचा किंवा छपराचा खण, कोठारातला खण, घराचा पु

आलेला भाग, उपगृह, चौकी, 'बे' नांवाचे लाकूड, तांबुस काळसर, कुमेत, कुमाईत, तेल्याबोर (रंग)खण्डक.-**Stall** पहा Carol. **Bay-bow window** सज्जाबारी, पुढे आलेल्या भितीतली तीन बाजूंची किंवा वर्तुळ खंडआकाराची खिडकी. **Dark bay** सारंगा (रंग).

Bay-window : सज्जाबारी

**Bazin's formula** आयतीय वीरकावरून होणारा निःसार काढण्याचे 'बेझिन-सूत्र'.

**Beach** समुद्रकाठ, किनारा, रेताड जमीन, पुळण, पुलिन, वेला, वेळा, ढकशी, किनाऱ्यावरची रेती. **–comber** किनाऱ्यावर आढळणारी अशी महासागरातून येणारी लाट (गुजरातींत 'घोडा'). **Sandy beach** वाळवंट, पुलिन, पुळण.

**Beacon** दीपस्तंभ, भयसूचक दीप-स्तंभ, मार्गदर्शक खूण, नावाड्यास वाट दाखविणारी खूण. **–fire** इशाऱ्याची आगटी. **Floating beacon** (मार्गसूचक-भयसूचक) दीपनौका. **Beaconage** दीपस्तंभाचा खर्च.

**Bead, Beading** लांबट गोलची, मण्यासारखी-माळेसारखी नक्षी. **Bead & quick, quick-bead** गोलचीस धरून केलेला खाचा असलेले नक्षीकाम. **Bead plane** गोलरंधा, कातकामातले गोलची मारण्याचे हत्यार. **Rebate-rabbet & bead** पहा Quick-bead. **Beading tool** बायलरच्या आतल्या नळ्या ठोकण्याचे हत्यार.

Beads: गोलच्या

**Beaker** चोचपेला, चंचुपात्र, पंचपात्र. **Beak-head** पाखरांच्या चोचीसह डोके दाखविणारे नॉर्मन थाटाचे नक्षीकाम. **Beakiron, bickiron, bickern** ऐरणीचे निमुळते टोक किंवा ऐरणीच्या भोकात बसणारा T आकाराचा खुंटा. **Beaking joint** जवळ जवळचे सांधे मिळून बनलेला सांधा.

**Beam** आढे, तुळई, तुळी, तुळवट, तुलाधार, बहाल, दांडी, तुला, धारण, सर, सरी, बार ; 'बीम' या संज्ञेत बडोद, गर्डर, वासे व पाखाडे या सर्वांचाच समावेश होतो. जहाजाची रुंदी, तोल-काट्यांची दांडी, तुलाय, किरण. **Beam (warper's or weaver's)** ताणा गुंडाळण्याचा दांडा, बींब, बीम, भीम. **Warper's beam** पांजण देण्याच्या पूर्वी सूत गुंडाळलेले बीम. **Weaver's beam** पांजण दिल्यानंतर ताणा गुंडाळलेले बीम. **Beaming** (गिरणीतील) बईखाते. **Built up beam** संघटित-जोडलेले बहाल. **Built in beam** आबद्ध बहाल. **Beam compass** पट्टी कंपास, सांगाडी कंपास, मोठा कंपास, बहाल कंपास, साध्या कंपासाला धातूचा किंवा लाकडी जोड दिला म्हणजे जो मोठा कंपास होतो तो (मोठा वक्र किंवा वर्तुळ काढण्यास याचा उपयोग होतो). **Beam engine** (तराजू सारख्या लांब) दांड्याचे एंजीन. लांबलचक बाराने (सुळक्याने) गति उत्पन्न करणारे वाफेचे यंत्र. **Beam filling.** पहा Spar foot filling. **Beams fixed and continuous** अनेक आधार असलेले एकसहा बहाल. **Beams flitched.** पहा Flitch. **Beam grillage.** पहा Grillage foundation. **Beam laid along the head of posts or pillars** लग. **Beam of parallel rays** किरणशलाका. **–rays** किरणसमूह. **convergent rays** मिटता शंकु. **divergent rays** फुलता शंकु. **Beam of the balance** तुलादंड. **Beam over two posts, Piece beam** खांड-तुळई, खांड. **Large beam** लाट. **Lengthening of beam** बहालाची लांबी वाढविणे. **Longitudinal division of a beam** चिरखांब (ड). **On the port beam** जहाजाच्या डाव्या बोडदावरचे किंवा याच बाजूचे समुद्रांतले. **On the starboard beam** जहाजाच्या उजव्या बोडदावरचे किंवा याच बाजूचे समुद्रातले. **Rectangular beam** आयतीय बहाल. **Small & squared beam** कडी, बडोद. **Tee beam** पहा (T.) **Transverse beam (of a draw well)** ओकती, अट (पाणी ओढण्याच्या मोटेची). **Trussed wood beam** कैंची बहाल. **Weather beam** जहाजाची वाताभिमुख बाजू.

**Bearing (inclination)** कल, झोक (Direction) रोख, मोड, मोडणी, क्षित्यंश. **(Relation)** संबंध, नाते. **(Meaning)** भावार्थ, मथितार्थ, दिगंश, दिक्स्थिति, दुसऱ्यावर आश्रित असलेला आंसाचा किंवा यंत्राच्या दांड्याचा भाग. धारवा, खोबण, फिरणाऱ्या दांड्याखाली (लाटेखाली) असणारा धातूचा निमगोल भाग. खोबळा, बैठक, दोन खोबणांमधला सुटा रहाणारा भाग. **(Support)** धारक **(The beam has twenty feet bearing between the walls)** अधांतर. **–bar** लांकडी लगे ऐवजी बडोदाची टोके ठेवण्यासाठी वापरलेला लोखंडी पाटा. **–bush** (फिरत्या दांड्याचा) भार वाहणारे बूच. **–capacity** धारणावंक. **–distance** बिन आधार अंतर, अधांतर. **–iron** लोहगर्भ. **–joints** आधारसांधे.

–of joints बडोदाधार. –pile धारणमेढ, धारिस्थूणा, –plate धारणपाट, धारिपाट. –power धारण, धारणाशक्ति, भारवाहक शक्ति. –pressure धारणा प्रेरण, धारव-प्रेरण. –strength धारणाशक्ति, धारणाक्षमता, सह:स्व, धारित्व. –support धारणाधार, धारु, आधार. –surface आधारपृष्ठ. –wall पुलाची किंवा कमानीची आधार भित-कडभित. **Beast bearing pitchers of water** माकण्या. **True bearing** दिशांश.

**Beaten path-road** वाट, क्षुण्णमार्ग, राबत्याचा-मळलेला –वहिवाटीचा रस्ता. **Beater** ठोकणी (सिलीपाटाखाली खडी दाबण्याची). **Beating-up** (बाण्याचे सूत) विणीत नेऊन बसविणे, विणीत ठांसणे, फणीने ठांसणी मारणे. **Beats** कलह, व्यतिकर.

**Beaufort wind strength scale** बोफर्टचे वायुमापक यंत्र (अॅडमिरल बोफर्टने १८०६ त याचा शोध लावला). वाऱ्याची शक्ति ताशी मैलानें मोजली जाते. वाऱ्याची गति आणि दिशा या उंचीच्या मानाने कमी-अधिक होत असतात.

**Beaumontage** लाकडी किंवा धातूच्या कामातली भोके वगैरे बुजविण्याचे लुकण.

**Beck** नाला, ओढा. –iron संधान, उभाळच्या.

**Because** कारण, यस्मात् (चिन्ह ∵).

**Becket** एका टोकास गांठ व दुसऱ्या टोकास कोयंडा असलेला दोराचा फांस, मोठा हूक, लाकडी माकडी.

**Bed** नदीचे पात्राचा तास, नदीचे पात्र, नरांडी, थर, स्तर, बैठक, स्तरसमुच्चय, ताटवा, तक्ता, क्यारी, वाफा. **To bed (a stone)** गच्च व न ढासळेल अशा रीतीनें (दगड) बसविणे, बैठक तयार करणे. **To bed the surface (of a stone)** (दगड) घडून तयार करणे. **Bedding** कळाशी, अस्तर-गादी (e. g., concrete). –block स्थंडिल, ओटा. –chamber room, –room निजायची खोली, रंगमहाल, शयनगृह, शेजघर. –charge (ओतकामातील) पहिला थर. **(plot) or Bed in a flower garden** खांबान. –(Foundation) स्थेमा. –of lathe कातकामाच्या सांगाड्याची-चरकाची बैठक. –level तळपातळी, तलोदाय. **Bedload** तलीन, तलीन भार. –pan रुक्-शौचनी. –plate (यंत्राची किंवा इतर सांगाड्याची) तळ बैठक, तल-पाट. -rock जमिनीखालील भरीव कातळ, शिलान्त, अश्माधार. –slope तलनितार. –stone स्तर समुच्चय, तलधी, तलधरी, तलपट्ट. **Bed & Assise** महामंडल.

**Bee** शिडांच्या दोऱ्या अडकवण्याकरिता नाळीच्या बाजूला मारलेल्या मजबूत लाकडी पट्ट्या. – line अगदी जवळचा मार्ग, दिलेल्या दोन बिंदुस्थळांमधील अतिशय कमी अंतर; आपल्या मोहोळाकडे ज्या जवळच्या मार्गाने मधमाशी जाते तो मार्ग.

**Beetle** खुंटचा मारण्याचा किंवा फरशा ठोकण्याचा जड लांकडी हातोडा, मोगर, मोगरा (दगड किंवा खडी ठोकण्या करिता). –head. पहा Monkey, Drop hammer

**Begun** वांग्याच्या आकाराची (**Begunia group**) बंगालकडील देऊळे.

**Being in phase** समायत्व, अयांश साम्य. **Being same in frequency** क्षिप्रता-साम्य.

**Beki** शिखराच्या 'अमलका' खालील दंडगोलाकृति दगड

**Belaying pin** बोटीतील दोरखंड गुंडाळण्याचा खुंटा

**Belfast truss** शंभर फूट गाळचापर्यंतच्या छप्परांसाठी (विमानगृह, किंवा काम चलाऊ इमारतीच्या) सोईची रिफांची हलकीशी कैची.

**Belfry** बचावासाठी किंवा हल्ल्यासाठी उपयोगी पडणार चालता हालता लांकडी बुरुज, घांटघुमट, घंटालय.

**Belgian block pavement** ३″×६″×१०′ आकाराच्या दगडांची फरशी. **Belgian truss.** पह French truss.

**Bell** घांटेचा आकार देणे. –Bunds, guide banks बेलबन्ड्स, नेत्रण तट; हे तट पूल किंवा बंधाऱ्यानजीक नदीच्या प्रवाहाचे नियंत्रण करण्यासाठी बांधतात; जे. आर बेल यांची ही मूळ कल्पना असल्यामुळे त्यांचे नाव यांना दिले जाते. –buoy लाटांनी वाजणारी घंटा असलेला बोयां –clapper, –tongue घंटेचा लोळा-लोळी. –cote घांट-घुमट, घांटबांधण्याचा घुमट –crank काटकोनी तरफ, उत्तोलनी –gable घांट-घुमट नसलेल्या चर्चचे छप्परावरची चांदईची भित (उभारून तीत घंटा बसवितात). –jar हंडी –metal कांसे, कांस्य, घंटा धातु (तांबें व जस्त यांचा मिश्र धातु) –shaped घंटाकार. **Bell's Formula** आधारभित जरुरीप्रमाणे मजबूत कशी असावी हे ठरविण्याचे 'बेल सूत्र'.

Bell crank : काटकोनी तरफ

**Bellows** (A pair of) भाता, भस्त्रा, धमण, पंखा. **Small bellows** भस्त्री, भातडी. **To work the bellows** भाता फुंकणे-धमकणे. **Hydrostatic bellow** जलभाता, पाण्याने चालणारा भाता.

Bellows : भाता

**Belly band** शीड आंवळण्याचा पट्टा, शीडदोर.

**Belt** (गोलावरचा किंवा पृथ्वीवरचा) कटिबंध, कंगणी, मेखला, वाटोळी ओळ-रांग, सामुद्रधुनी, पट्टा (दोन यंत्रावरचा); एका यंत्राने दुसऱ्या यंत्रास गति देण्याला याचा उपयोग करतात –of calms निर्वात मंडल, शांत प्रदेश. –conveyor पट्टावाही, वाहकपट्ट. –course दगड किंवा विटांचा पुढे आलेला थर. –fork, –striker,

**strap fork** पट्टयाचा वाटाडचा (जलद चालणाऱ्या कप्पीवरून मंद चालणाऱ्या कप्पीवर किंवा या उलट पट्टा सरकवणारा. **–pulley** पट्टयाची कप्पी (पुली) **–punch** पट्टयांस दाबून भोके पाडण्याचे यंत्र, पंच. **–rivets** चामडयाचे पट्टे सांधण्याचे खिळे–रिबेट. **–shifter** पट्टयाच्या वाटाडयाचा दांडा. **Leathern belt** दालू. **Life belt** संकटसमयी बोटीतील उतारूंकरता केलेला बुचांचा कमरपट्टा-सांगाडा. **Plate of belt** चपरास.
**Belting** यंत्राचे पट्टे करण्याचे मऊ चामडे. **Canvas belt** कॅनव्हासचा पट्टा. **Camel hair belt** कापसाचे दोर, केस, रबर वगैरेंच्या मिश्रणाने बनविलेला पट्टा. **Belting machinery** (मोठ्या गठ्ठयांना) लोखंडी पट्टया मारण्याचे यंत्र.

**Belvedere** मनोरा, गोपुर, प्रासादशृंग, उच्चस्थानी बांधलेले हवाशीर गृह. संध्याकाळचा गार वारा लागेल अशी केलेली गच्ची.

**Bema** चर्चमधील धर्मोपदेशकांसाठी खास केलेले उच्चासन.

**Ben** अंतर्गृह, पर्वताचे शिखर.

**Bench** न्यायासन, धर्मासन, बाक **–drilling machine** टेबलाला बसविलेले भोके पाडण्याचे यंत्र. **–hook or jack** आडत्या [पातळीची (फरशीची) फळी]. **–lathe** टेबलावरील लहान चरक-लेट. **–mark (B. M.)** तलचिन्ह, संदर्भिका, प्रमाणचिन्ह. कायमची टिकणारी खूण-जागा-इमारतीचा भाग--बांधकामाचा दगड; दुर्बिण-कामास सुरुवात करतांना व काम संपवितांना संदर्भ म्हणून या खुणा अवश्य असतात, प्रकेत. **–plane** मेजावर चालवावयाचा रंधा. **–vice** टेबलाला बसवलेला शेगडा. मेजीसवाटन (लांबी ४′ ते ५′ रुंदी २७″ ते ३६″ व उंची २७″ ते ३३″).

**Bend, Bent** बांक, वांक, वक्रता, वांकडेपणा, वळण, मोड, वांकाड, वळसा, वांकण, वक्रतेचा कोन, वांकवलेला, वांकडा, वक्र, तिडा, तेढा, तिडका, एक दोर दुसऱ्याला बांधतांना वळवून दिलेली गांठ; जसे **cable bend, Carrich bend, Fisherman's bend. Bend or Recess in a hill** डोंगराचे लवण. **Bending** अवनमन, वंकण, विनाम. **–machine** चपटे पत्रे अगर लोखंडी गज वगैरे वांकविण्याचे यंत्र.**–moment (B. M.), moment of rupture** विनामक परिबल. **–stress** विनामक दाब–प्रेरण-विकारण. **–test** विनाम परीक्षा, **–**कषणिका, **–**कषणी. **Slight bent** बागर. **Bent (curving)** वक्रिमा. **–framework** घोटक, घोटिका. **–gauge** वांकडे अथवा बांक दिलेले लांबीचे अथवा जाडीचे माप, वांक, दिलेला गेज. **–hook** बलिश, बडिश. **–tube** बांकनळी, वक्रनलिका. **–wood** कृत्रिम रीतीने पाहिजे तो आकार दिलेले भरीव लाकूड.

**Beneficiating (lime-stone)** शुद्धिकरण.

**Benezene, Benzia, Benzine, Benzinum, Benzol, Benzole** धुपीन, **(Hydrophenyl)** उज्ज, **(Hydrogen)** आणि कर्ब **(Carbon)** ह्यांचा संयुक्त पदार्थ, उदीन.

**Bengal light** जहाज फुटल्याची खूण म्हणून समुद्रांत दाखविण्यांत येणारा तीव्र प्रकाशझोत. एकाद्या ठिकाणी उडविण्यात येणारे दारुकाम-आतषबाजी.

**Benzoin, Benzoine or Styrax** शिलारस, लोभानी, लोहबंद ऊद, देवधूप. जनार्दनी ऊद **(of inferior quality)** ऊद, कवडचा ऊद, कपिश, धूपराळ.

**Bepaint** सर्व बाजूंनी रंग लावणे.

**Berg** हिमगिरी.

**Berm** उपोष्ठ, मेखला (१) भरावाचा पायथा व खोदाईचा माथा यांच्या कडा विस्कळू नयेत म्हणून पायथा व माथा यांमध्ये राखलेली जादा रुंदीची पट्टी. (२) उंचवर भरावाच्या उतारातील एकसारखेपणा कमी भासावा म्हणून उतारात सोईस्कर रुंदीची जी पायरीवजा सपाट पट्टी ठेवतात ती. (३) मुख्य भरावाच्या माथ्यापेक्षा खालच्या पातळीवर जादा भराव करून त्याचा माथा सपाट ठेवतात. (४) कालव्याच्या पाण्याची कोर व आतील उताराचा पायथा यांमध्ये पाण्यातील गाळ सांचून बनलेली पट्टी. खुली अरुंद कड-पट्टी.

**Bermudas** आडजागा (जागेच्या स्वस्ताईकरिता कोठे-तरी) आडजागी रहाणे.

**Bernoulli's theorem** चलद्रवांच्या सुसूत्र प्रवाहाच्या संशक्तिबद्दलचा 'बर्नूली नियम' :—प्रवाहातल्या कोणत्याही ठिकाणचे शक्तिवर्चस् खालील बाजूच्या कोणत्याही ठिकाणचे शक्ति वर्चस् व कित्येक कारणांनी मध्यंतरी झालेली घट यांच्या बेरजेइतके असते.

**Berry** उंचवटा, टेंकाड.

**Berth** गलबत नांगरण्याची-उभे राहण्याची जागा-धक्का, नांगर टाकणे. **Berthage** नांगरणावळ. (बंदरात जहाज नांगरल्याबद्दलची जकात). **Berthing impact** गलबत नांगरणीत बसणारा धक्का.

**Beryl** एक प्रकारचा पाषाण, गोमेद ; हा विदुर येथे प्रथमतः आढळला. ह्यात भविष्य दिसण्याचा अद्भूत गुण असल्याची आख्याइका आहे, वैडूर्य. **Berylline** गोमेदा-सारखा निळ्या हिरव्या रंगाचा. **Beryllium** बेरिलिअम नांवाचे एक रासायनिक मूलद्रव्य, विदुर, विडूर, विडुरातु.

**Bessemer** सर एच. बिसेमरच्या पद्धतीने तयार केलेले पोलाद. याचा उपयोग आगगाडीचे रुळ, चाकांच्या धावा वगैरे करण्याकडे करतात. **–process** बिसेमर पद्धती.

**Beta particle** बीजक, ब-अल्पकण.

**Beta rays** बीटा किरण हे ऋणविद्युद्युक्त कणांचा **(electrons)** प्रवाह असतो व त्यांनाही लोहचुंबकाच्या साहाय्याने एका बाजूस खेचता येते.

**Bethel** मेथॉडिस्ट लोकांची प्रार्थनेची जागा (देऊळ). समुद्रात कायम केलेले (खलाशांचे) प्रार्थनेचे तारु.

**Betty** पहार, कटवणी.

**Bevel, Bevil** इराप, विषमकोण, काटकोनापेक्षा लहान किंवा मोठा कोन, दोन पातळ्यांमधील कोन. पृष्ठ भागाच्या कडची उतरण. (ओ त का मा ती ल) कोडी, कोनेदार, कोनदार, तिरकस, चळत्या काटकोनासारखा. काटकोनात नसणे, झुकता असणे, तिरकस कापणे, कडेचा उतार काढणे, उतरती धार पाडणे. बडी (ही खोड व पाते यांची बनविलेली असते; खोडांच्या मधील स्क्रूच्या साहाय्याने पाते खोडाशी वाटेल तो कोन करून बसविता येते. हीचा उपयोग लघु व विशाल कोनात रेषा मारण्याकडे करितात). **–board or pitch board** जिना किंवा छप्पराच्या मांडणीतले विषम कोण आखण्याच्या सोईचा फळा. **Bevelled edge** उतरती धार, वाड-धारेचा ढ.ळ. **gear** दोन तिरकस दात्यांच्या चक्राची रचना; ह्या रचनेने एका आसाची गति दुसऱ्या आसाला देता येते. **–gauge** या गेजने कोनांची चाचणी व आखणी करता येते. **–pinion** मोठ्या चाकांच्या दात्यात फिरणारे लहान उतरत्या दात्यांचे चाक. **–protractor** चळता कोनमापक, यान कोन अंशापर्यंत मापता व आखता येतात. **–square (adjustable)** चळता काटकोन (न्या), चळता गुण्या, बडी. **–wheels** तिरकस तिर्यक् दातांची चक्रे, कोनाकार दंतचक्रे.

Bevel, Bevil : चळती कड

२

Bevel : बडी

Bevel gear : दंतचक्र

**Bezel, Bazil, Bezil** तारणीच्या पानाची निमुळती धार, कांचकडी (कांच बसविण्याची) खाचदार कडी, कोंदण, घर.

**B. H. P. (useful or brake horse-power)** इस्तागत तरस्व-तुरगता. पहा––H.

**Bi** द्वि, जसे **Bi-basic** द्विभास्मिक, अल्प, अपूर्ण; जसे **Bi-carbonate** अल्पकर्बनित.

**Bhrama** प्रदक्षिणापथ.

**Bhadra** शिखराचा सपाट पैलू.

**Bhamli** Cells in the inner face of the Containing wall of a temple.

**Biangular** दुकोनी, दोन कोपऱ्यांचा, द्विकोनी.

**Biaxal, Biaxial** दोन आसांचा.

**Bi-basic** द्विभास्मिक.

**Bib-cock** पाण्याचे नळाची तोटी, बिबकॉक.

**Bicameral** दोन दालने असलेले.

**Bicarbonate** अपूर्ण-अल्पकर्बनित, उज्जकार्बनिक.

**Bice, Bise** हिरवा रंग, फिकट निळा रंग.

**Bichromate cell** द्विक्रोमिक, लालखडी विजेरी.

**Bickern** (चोचेसारखी) दोन शिंगाटी असलेली ऐरण, दोन शिंगाटयांची ऐरण, ऐरणीचे शिंगाटे.

**Biconcave** उभयनिम्न, उभयांतर्गोल, दुहेरी खोलगट.

**Biconvex** उभय बाह्यगोल-स्फीत, दुहेरीफुगट.

**Biexpression** द्विपद समूह, द्वियुक्त पदसमूह.

**Bifilar** द्विसूत्री, द्वितंतुक.

**Bifocal** द्विकेंद्रक.

**Bifurcate** दुभागणे. **Bifurcated stick** डेळी, डेली, डेळके. **Bifurcation** दुभागणी.

**Bigha** बिघा, वीस पांड, २३ गुंठे, २,७८३ चौरस वार. १२० बिघे=चाहूर, चौर, चऊर. ३० बिघे=५ पडतन=पाईण, पाईन. २० बिघे=खंडी. **Assessment per Bigha, Reducing measurement into Bigha** बिघावणी.

**Bight** अढी, वेटाळे. गाळा, उपसागर.

**Bike** जमिनीखाली लपावयाची जागा.

**Bilaminar** दोन पातळ पत्र्यांचा, दोन पातळ पत्रे असलेला.

**Bilateral** दुबाजूंचा, दोन बाजू असलेला, द्विपार्श्व, दुपाखी.

**Bilge** पिंपाचे पोट, गलबताचे पोट. **–pump** आगबोटीतील घमत काढावयाचा बंब. **–water** घमत, गमत, गम्मत. **Cavity left (in a ship) for the bilge water to collect** घमतड-डी, गमतड-डी-ताड.

**Bilinear form** द्विघात रूप.

**Bill** हुंडी, देयपत्र. कोयता, कुरंदी, कोयती, पायळा, पाळा, पाईल. (woodman's) बोडसे, खराळ, खरळा, (grass sickle) खराळी, लवित्र, आऊत. **–hook** (झाडे तोडण्याची) आकडी असलेला मोठा कोयता.

**Billet** तीन बाजू चिरीव व चवथी तशीच ठेवलेला लाकडाचा ओंडका. ओंड्यासारख्या दिसणाऱ्या लहान लहान नळकांड्या किंवा चौरस कांड्या सारख्या अंतरावर बसविलेले नॉर्मन धर्तीचे नक्षीकाम.

**Billion** $१०^{९}$ एक हजार दशलक्ष **(million)** इतकी संख्या अमेरिका व फ्रान्समध्ये धरतात; इतरत्र $१०^{१२}$ (एक दशलक्ष दशलक्ष) इतकी संख्या धरतात.

**Billon** शिक्के पाडण्यासाठी सोने व रुपे यात मिश्र केलेली हलकी धातु.

**Billow** गहुचा (वाऱ्याने फुटलेली समुद्राची मोठी लाट).

**Bimetallic** द्विधातुक.

**Binary** द्वितय, द्वित्त, द्वैती, दुहेरी, द्विगुण, युग्मक, द्विमूलक दोन मूलतत्त्वे मिळून झालेला. **–arithmetic** द्वांशगणित, द्वांशपद्धतिप्रमाणे लिहिलेले अंकगणित. **–eclipsing** पिधायी द्वैती. **–scale** दोहरा, दुर्वारीताल, द्विक्रम, शून्य आणि एक यांनी बांधलेली अंकपद्धति. **–stars** द्वैती तारे. **–theory** द्विभौतिक वाद.

Binders : बहाल (१) लाकडी (२) लोखंडी

संयोजी, बंधन (शक्ति) **–wire** बंधक तार. **Bindings** दुवे (सलोह कॉन्क्रीटच्या सांगाडचातील शलाकांना जोडणारे).

**Binnacle** होकायंत्र पेटिका. ह्या पेटीत होकायंत्र दिसण्याकरिता दिवाही असतो.

**Binocular or Binocular glass** जोड दुर्बिण, दोन नळचांची दुर्बिण, नाटकी भिंग, द्विनेत्री. **Binocular vision** एकदम दोन्ही डोळे वापरून मिळालेला देखावा, एकाग्र दृष्टि.

Binocular : दोन नळचांची दुर्बिण

**Binnie's percentage** बिनी प्र. श. (=प्रतिशतक).

**Binnie's rules for run-off** 'वार्षिक तोयापा' संबंधांत 'बिनीचे नियम'.

**Binode** द्विपात. **Binodal** द्विपातीय.

**Binomial** द्विपद, द्विपदी, ऋण किंवा धन चिन्हांनी जोडलेली दोन पदें जसें अ + ब किंवा अ—ब. द्विपद-दोन पदे असलेला. **–expression** द्विपद समूह, द्वियुक्त पदसमूह, द्विपद वाक्य. **–theorem** द्विपद सिद्धांत. ह्या सिद्धांताच्या योगाने हव्या त्या द्विपद संख्येचा हवा तो घात एकदम लिहिता येतो.

**Binormal** द्विमुखलंब, उपप्रलंब.

**Biolite** काळा अभ्रक.

**Biology** प्राणिशास्त्र, जीवनशास्त्र, जैव, जीवशास्त्र. **Biotic** जैवी, जैविक.

**Biologist** जीवशास्त्रज्ञ.

**Biometry** जीवांकिकी.

**Bioscope** चलचित्र दर्शी, चलत्‌चित्रदर्शक.

**Bipolar** द्विध्रुव.

**Bi-product** उपफल.

**Biquadratic** चतुर्घात, वर्गाचा वर्ग. द्विवर्गीय-या-यं. **–equation** द्विवर्ग समीकरण, चतुर्घात समीकरण. **–root** द्विवर्गमूळ.

घेतलेले देखावे. **Bird's mouths** चोच खांचा, पुनः प्रवेशक खांचा; पहा B. M. joint (चोंचखांच सांधा).

**Birth, Berth** गलबत नांगरण्याचे ठिकाण.

**Birmingham wire gauge (B. W. G.)** बरमिंगहॅमची तारांची जाडी मोजण्याची भोकाभोकांची जंतरपट्टी; हिने जाडीचे मेज ०·४५४″ पासून ०·००४″ पर्यंत घेता येते व ते अंकांनी दर्शविले जाते.

**Bisect** दुभागणे, दुभेदणे, समद्विभाजनकरण. **Bisected** द्विखंडित, दुभाग, दुखंड. **Bisecting line** समद्विभाग रेषा. **Bisecting point** मध्यसमच्छेद बिंदु. **Bisection** समद्विभाजन. **Bisector of an angle** कोनद्विभाजक, कोनदुभाजक-द्विधाकर. **Bisects externally** बहिर्दुभाजक.

**Bisegment** एका रेषेच्या किंवा आकृतीच्या दोन सारख्या भागांपैकी एक भाग, दोन समविभाग करणे.

**Bismuth** बिस्मिथ; कलाकृति किंवा औषधांसाठीही या धातूचा उपयोग होतो.

**Bits (used in braces)** डोळमिटाची पाती :—**Auger bit, Drill bit, Flat head bit, Forstener bit, Jimlet bit, Nose bit, Rimer bit, Rose bit, Shell bit, Snail bit, Spoon bit, Taper bit** याखेरीज **Centre bit** केंद्र पाते. **Expansion bit** समयोजक पाते, **Turnscrew bit** स्क्रू चावी पाते, **Twist bit** गिरमिट पाते, वगैरेही आहेत. **Bit stock** डोळमिट, भोक पाडण्याचे लहान हत्यार रंध्याचे पाते.

**Bitangent** द्विस्पर्शज्या, द्विस्पर्शरेषा, दोन स्पर्शबिंदूंतून जाणारी (एक रेषा).

**Bitumen** ज्वालाग्राही खनिज पदार्थ किंवा द्रव्य, शिलाजीत किंवा शिलाजतु. **Bitumed, Bituminous** ज्वालाग्राही खनिज पदार्थाचा अंश असणारा. **–coal** डामरी कोळसा.

**Biuret** द्विमूत्रेत.

**Bivalent** द्विमूल्य, द्विसंयोजक, द्विसंयुज.

**Black** काळा, कृष्ण, कृष्णवर्ण. काळा रंग. **–band** लोखंडाचे भस्म करण्याइतका ज्यात कोळशाचा भाग आहे असे अशोधित लोखंड. **–body radiation** कृष्णकीय प्रारण. **–chalk** निळ्याकाळ्या रंगाच्या लिहिण्याच्या पाटीचा पदार्थ; याचा काळा रंग करण्यासहि उपयोग होतो. **–earth** काळी माती, नीलमृत्तिका, काळी. **–gang** जोडगिरी,

लोहारकाम, अवजार दुरुस्ती वगैरे सारखी कामे करणारा वर्ग. **–iron** बिनजस्ताळलेले लोखंड. **–japan** काळा तेल्या रंग. **–lead** प्लंबगो, मुरदाड शिसे, शिसपेन्सिलीची धातू. **–mortar** चुना व बॉयलरातील राखाडी यांचा मळणा. **–topped surface** डामरपृष्ठ. **–walnut** काळ्या अक्रोडाचे लाकूड; हे घनसांवळ्या रंगाचे असून याचा उपयोग लाकडी सामान, मंजूषा, सजावट वगैरेकडे होतो. **–wood** शिसम, शिसव, शिसवी लाकूड, अबनूस. **–wood tree** शिशी-शिशवीचे झाड. **Relating to the black wood tree** शिसवी, शिंसवी. **Dead black** निस्तेज काळा. **Intensely black** काळाभोर, काळाकुळकुळित, काळाकभिन्न. **Blackish** काळसर.

**Blade** पान, पाते, छपराचे मुख्य वांसे. **Two bladed** दुपानी, दुपाती, दुतलफी.

**Blanch** (लोखंडाच्या पत्र्यांना) पांढऱ्या जस्ताची कल्हई करणे.

**Blandford rules for rainfall** पर्जन्यवृष्टी-बद्दलचे ब्लँडफोर्डचे नियम.

**Blank** लक्ष्य, निशाणावरील पांढरा टिपका, स्क्रू किंवा इतर वस्तूंकरिता तयार केलेली धातूची कांब किंवा तुकडा. तयार वस्तू बनविण्याच्या सोईचा असा इष्ट आकारमानाचा तयार केलेला लांकडी तुकडा. **–desert** झाडे-झुडपे नाहीत असे अरण्य. **–door,-window** (साम्य दिसण्यासाठी दाखविलेला) भिंतीतील खोटा दरवाजा किंवा खिडकी. **–wall** खिडक्याद्वारे नाहीत अशी भिंत.

**Blanketing** (कालव्याचा तळ किंवा बांधाचा पाण-बाजूचा ढाळ व जलाशयाचा नैसर्गिक तळ) जलाभेद्य पदार्थांने लिंपून काढणे.

**Blast** स्फोट करणे, सुरुंगाने फोडणे-उडवणे, सुरुंगाचा स्फोट, वायूचा झोत. **–furnace** झोतभट्टी, (धातूचा रस करण्याची) वाऱ्याच्या झोताने चालणारी भट्टी **–hole.** (पाणी उपसण्याच्या यंत्रांतील) पाणी आत नेणारे तळचे छिद्र. **–pipe** (इंजिनातील फाजील) वाफ धुराड्यावाटे बाहेर नेणारी नळी. **–of lightning** विद्युत्पात. **Blasted metal** सुरुंगी खडी. **Blaster** सुरुंग्या. **Blasting** उत्स्फोटन, सुरुंग लावणे. **–gelatine** सुरुंगी कापूस, (प्राणिज खळ देऊन तयार केलेला) सुरुंगासारखा उपयोगी पडणारा कापूस. **–powder** सुरुंगी दारू **Blastment** सुरुंगाने फोडलेल्या दगडाची रेषा. **In full blast** पूर्ण भरात.

Blast furnace : झोतभट्टी

**Blaze** (साल कापून केलेली) झाडावरची पांढरी खूण. (रस्ता किंवा हद्द दाखविण्यासाठी) साल कापून झाडांवर पांढरी खूण करणे.

**Bleach** ओपविणे. **Bleacher** कपडे धुण्याचे यंत्र, धोबी. **Bleaching** विरंजन, रंगहरण. **–action** विरंजन क्रिया. **–green** ओप दिलेले कपडे सुकवावयाचे मैदान **–powder** विरंजक चूर्ण.

**Blemish** काहीतरी खोड असल्यासारखे भासणारे इमारती लाकूड.

**Bletonism** जमिनीत पाणी कोठे सांपडेल हे शोधून काढण्याची विद्या, 'ब्लीटन'ची पाणी सांगण्याची विद्या.

**Bligh's creep theory** 'ब्लाय' ची 'निसर्प उपपत्ति' ; ही पद्धत आता उपयोगात नाही.

**Blind** झाकलेला, किर्र अंधःकाराचा, बंद, (खिडकीचा) पडदा, आडपडदा. **–alley** एका बाजूने बंद असलेली गल्ली. **–arch** मुकी कमान ; दुसऱ्या बाजूस असलेल्या खऱ्या कमानीशी साम्य दिसावे म्हणून कमानीचा भास होणारी केलेली नक्षी. **–area** तळघराभोवतालचे खणलेले क्षेत्र (यात ठेवलेल्या मातीच्या पुस्तीच्या भिंतीमुळे हवा खेळती रहात नाही. **–axle** मुका आंस, फिरता पण गति न देणारा आंस. **–coal** ज्वाळेशिवाय जळणारा कोळसा. **–door or wall** हवा किंवा उजेड आंत येण्यास मार्ग नसलेला दरवाजा किंवा भिंत. **–drain.** पहा Rubble drain. **–mortise** अर्धविंध (आरपार नाही असे). **–storey.** पहा Storey. **Venetian blinds.** पहा Venetian. **Bliandage** मलमा, उधळलेल्या खडीच्या किंवा खडबडीत अशा रस्त्याच्या पृष्ठास नरमपणा यावा म्हणून रस्त्यावर पसरतात तो नरम मुरूम किंवा रेती. लाकडाचा तट, लाकडी झापण (तोफेचे गोळे आपणावर पडू नयेत म्हणून हे उभारतात). **Blinding** डामरी रस्त्यावर कच पसरणे, कचेची छाट मारणे किंवा खडीच्या रस्त्यावर मुरूम किंवा रेती पसरणे.

**Blister plaster** स्फोटकर पलिस्तर. **Blister-blistered steel,** पोलादाचा पृष्ठभाग काही रीतीने कठीण करण्याच्या कृतीमध्ये काही रसायन द्रव्यांच्या योगाने ज्याच्यावर पोपडे उठतात ते –ज्यावर पोपडे येतात असे शुद्ध पोलाद, पोपड्यांचे पोलाद. **Blistering** फुगा येणे, पोपडा येणे.

**Block** ओंडा, ठोकळा, टोणका, (दगडाचा) गुंडा, ठेकी, चिरा. (घर्षणाच्या धातूखालील) ठोकळा, पट्टा, संच. चारी बाजूंना रस्ते असलेला भाग-वाडी. विऱ्हाडाचा स्वतंत्र गाळा-खंड. (मोठ्या इमारतीतला) ब्लॉक. **–board** एक इंची रिफा जोडून केलेला गाभा व वरखाली पातळशा सलंग पापुद्रेवजा फळ्या बसवून केलेला फळा. **–house.** लांकडी किल्ला. (लढाईत संरक्षणाकरिता करतात व ह्यातून तोफा सोडता याव्या म्हणून भिंतीत भोके ठेवलेली असतात). ठोकळ्यांची कामचलाऊ तटबंदी. **–joint.** पहा Wiped Joint. **–pavement** दगडी, लाकडी किंवा दुसऱ्या कसल्यातरी लंबचौरस ठोकळ्यांची रस्तेबंदी-रस्तेबंदी करणे. **–plan** घर बांधण्याची जागा व

हल्लीच्या (असल्यास) व नव्या घरांच्या रूपरेषा दाखविणारा नकाशा. **–plane** सहा इंच लांबीचा रंधा. **–printing** खंड-मुद्रण. **–pulley** कप्पा, कप्पी किंवा कपी ; (बांधलेल्या दोरास चावी म्हणतात); (सांकटण्यासाठी सुतार वापरतो ती) घोडी, वाधी, सकोटन, सांकटन, नेहा. **–ship** शत्रूला अडविण्यास उपयोगी पडणारे लढाऊ जहाज. **–system** रेल्वेच्या एका भागात एक गाडी असता दुसरी गाडी त्याच दिशेने न येऊ देण्याची पद्धत, पट्टा पद्धति. विशिष्ट गटास आखून दिलेली पाणीपुरवठ्याची पद्धत. **–tin** जस्ताच्या लगडी किंवा विटा. **–of houses or buildings** वाडगे, समुदाय, वाडा. **Friction blocks** खुराल, खुराली, खुरालिका. **Hollow blocks** पोकळ ठोकळे. **Block in course** ठोकळ्यांच्या थरांचे काम. **Blocking** आवर्तन रुकावट. **–course** कंगणीवरील दगडांचा थर. **Blocks** पाण्याचा भारी वेग मंद करण्यासाठी व वेगामुळे तळाची संभाव्य धूप टाळण्यासाठी ओढ्यात घातलेले आडवे बांध.

**Blocade, Blocking** कोंडी, वाटकोंडी, वाटबंदी, नाकेबंदी, लष्करी चौकी. **Blockader** गराडा घालणारा, कोंडमारा करणारे गलबत.

**Blood stone** रक्त थांबवणारा दगड, गर्द हिरव्या रंगाचा गारेच्या जातीचा तांबड्या गोमेदासारखे ठिपके असणारा दगड.

**Bloom** अशुद्ध खनिज लोखंड शुद्ध करण्याच्या पहिल्या कृतीचे भट्टीत तयार झालेला लोखंडाचा गट. **Bloomery** वरच्याप्रमाणे तयार झालेले लोखंड ठोकून काही प्राथमिक आकार देण्याचे यंत्र.

**Blow off clock** बायलरातील पाणी बाहेर सोडून देण्याची खालच्या आंगची तोटी, बायलरची तोटी. **Blow hole** ओतीव लगडीत धातूचा रस थंड होत असताना त्यात राहून गेलेल्या गॅसमुळे पडलेली छिद्रे. सोस-भट्टीत वारा सोडण्याचे तोंड.

**Blow pipe** फुंकनळी, फुंकणी.

Blow pipes : फुंकनळ्या

**Blow room** भुलेरखाते, ह्यात कापूस पिंजून 'लेप' बनवितात. **Blower** (भिंतीतल्या शेगडीवरची हवा खेळण्याकरिता-धान्य साफ करण्याकरिता-खोलीतील हवा वाढविण्याकरता ठेवलेली) पट्टी-पंखा. फिरती धमण-पंखा, फुंकणी. **Blown joint** दाब नसलेल्या शिशाच्या नळांचा फुंकनळी किंवा दिव्यांच्या साहाय्याने केलेला सांधा. **Blubber** चरबी.

**Blue** नील, निळा, श्यामवर्ण, अस्मानी, निळा रंग, आकाश. **–bricks** स्टॅफोर्डशायर येथे तयार होणाऱ्या निळ्या विटा ; या कठीण व मजबूत असल्यामुळे धक्के, कमानी वगैरेसाठी या वापरतात. **–cobalt, Cobalt blue, Blues copper** ताम्राचा भुरा. **–litmus** निळा लिटमस. **–print** नीलप्रत, नीलिका, नील-छायिका. **–printing,** नीलिका-मुद्रण. **–stone, –vitriol, –jack** मोरचूद. **–water** महासागर. **Dark blue** काळा निळा, नीलश्याम, श्यामल. **Indigo blue** निळा. **Light blue** फिकट निळा. **Pale blue, Bluish** निळसर. **Sky blue** अस्मानी रंगाचा, मेघवर्ण. **True blue** नील-राग. **Blueness** नीलिमा.

**Board** (दोन इंचांपेक्षा कमी जाडीचा) फळा, तक्ता, तखता, फरदा, फळ्या घालणे, जेवणाचे मेज, गलबताची बाजू, बोडद. **–foot** बोर्ड फूट, फळी माप पद्धतीचा एक ; एक इंच जाडीची बारा इंची चौरस फळी. १९८० बोर्ड फीट म्हणजे एक 'स्टँडर्ड'. **–measure** फळीमाप. बारा इंची चौरस व एक इंच जाडीची अशी इमारती लाकडाची फळी (अर्थात् $\frac{1}{12}$ घनफूट). हा या मापाचा एक धरतात. **Aboard** गलबतावर, जहाजावर. **Composed of boards** तक्ती. **Diagonal board** कर्ण ठोकळा. **Larboard** डावे बोडद. **Over board** गलबताच्या बाजूवरून. **Snow boards** छप्पराच्या गटाराला लागून साचलेल्या बर्फाचाहि निचरा होण्याची रिपा बसवून केलेली व्यवस्था. **Star board** उजवे बोडद. **Board (14″ × 9″) on captain's table** अडत्या. **Boarding** तक्तपोशी घालणे, फळ्या घालणे.

**Boast, Boasting** मोठ्या छिन्नीने दगड घडविणे, दगड घडवून नकशीचे कामाला लायक करणे, वर नक्षीकाम करण्यासाठी पुढे आलेला दगड. **Boasted ashlar** पहा Chiselled ashlar. **Boasted work.** पहा Droved work. **Boaster** दगड घडण्याची छिनी.

**Boat** नाव, नौका, तारू, डोंगा, पाणवारू, होडी, नौ, बोट, जलयान, तर, तरण, तरणी. **–bridge** तरता पूल, नौकोत्तार. **–carrying from 5 to 20 candies** पडाव, पडांव. **–carrying from 50 to 500 candie's burden** बतेला. **–for shallow water** बांबोट. **–house** होडीची छपरी. **–scaffold.** पहा Cradle scaffold. **A little boat (canoe)** प्लव, तर. **Master of a boat** तांडेल. **Pilot-**

**boat** मार्गदर्शक होडी. **Song of a boatman whilst rowing** चकवा. **The bottom of a boat** पठार. **Boatage** नोर, होडीतून नेणावळ. **Boating** नौकाविहार. **Boatman** आंबी, आंबेकरी, नावकरी, नावेकरी, नावाडी-ड्या, नाववाला, नाविक, होडीवाला, खलाशी.

**Bob** आळंब्याचे वजन, लंबकाचा लोलक, लोळा, लोळी, गोलक, गोल. जुन्या तराजूसारख्या (बीम एन्जिन) दांड्याच्या इंजिनात चालणारी लठ्ठ दांडी.

**Bobbin** सूत गुंडाळण्याची पोकळ फुंकणी, बांबू, बाबीन (लहान बाबीन) कांडी, नळीचे तोंड रुंद करण्याची गुडदी. **Body** पदार्थ, वस्तु (स्त्री). **–colour** अंगरंग (रंगाची सुसंगति, मूलद्रव्यें व झांक यांची क्षमता दर्शविणारा). **–in equilibrum** पदार्थांची संस्थिति. **–of road** मार्गमध्य.

Bobbin : बॉबिन (नळांची तोंडे रुंदावण्याची गुडदी)

**Bodhika** बोधिका, स्तंभशीर्ष. **Bodigai, Pushpabodhika** पुष्पबोधिका, पुढे आलेला तीर किंवा घोडा (स्तंभशीर्षाचा).

**Bog** रुतण, दलदलीचा प्रदेश, अनूप. **–ore** दलदलीच्या जागेत सापडलेले एक प्रकारचे अशुद्ध लोखंड.

**Boggy** दलदलीत, थलथलीत चिखलाचा.

**Boiler** उकळण क्कथनी, बाष्पपात्र, बॉइलर, बंब. **–composition** बायलरमधील पाण्यातील क्षार व इतर (विजातीय) द्रव्ये यांचा कीट व पुटे बायलराच्या पत्र्याला बसू न देणारे द्रव्य. **–coverings** बायलरची उष्णता बाहेर जाऊ नये म्हणून त्यावर थर घालण्याची एक प्रकारची बाहेरून लावण्याची माती. **–houseroom** बंबघर. **–maker's hammer** बॉयलरच्या भेगा बुजविण्याच्या, धार मारण्याच्या, तोंड फुलविण्याच्या व खवले काढण्याच्या कामाची खास हातोडी. **–test** बॉयलर परीक्षण, बॉयलरची दाबक्षमता व जलाभेद्यता अजमावण्यासाठी जादा पाणदाब देऊन घेण्यात येणारी कसोटी. **Cornish boiler** एका चुल्याचा बॉयलर. **Lancashire boiler** दोन चुल्यांचा बॉयलर **Locomotive boiler** आगगाडीचा बॉयलर. **Tubular boiler** नळ्यांचा बॉयलर. **Boiling** उत्कलन, विप्लव, कढणे, उकळणे, बुद्बुदन. **–point** उकळबिंदु, उत्कलन बिंदु, विप्लवबिंदु, क्वथनांक, बुद्बुदांक, कढाचा-उकळी फुटण्याचा बिंदु, उत्क्वथन बिंदु. **–spring** उन्हाळे, कढत पाण्याचा झरा. **Boiled linseed oil** बेलतेल. **Thing boiled** क्वाथ.

**Bole** झाडाचा बुंधा, झाडाचे खोड, मातीची एक जात, जीत मुख्यत: गार, अल्युमिना, हुरमूज वगैरे सापडतात अशी. भिंतीतील झरोका.

A-2405—3-B.

**Bollard** नांगरखुंट.

1 Bell Dolphin : डुलता नांगरखुंट. 2 Bollard : नांगरखुंट. **Bolometer** तेजोबलमापक, सूर्यकिरणांचे पृथक्करण केले असता उत्पन्न होणाऱ्या निरनिराळ्या रंगातील असलेली उष्णता मोजण्याचे यंत्र.

**Bolster** (भोक पाडतांना वापरलेली) पोकळ पट्टी, आधारपट्टी, आधाराकरिता लावलेली कांब, बाहुचगोल, (लोडासारखी) गोलाई, मणि, टकण.

**Bolt** खीळ, खिळी, अर्गला, अगळ, अडणी, अडसद, अडसर,

१ ते ४ Lewis bolts : लुई. ५ Rag bolt : रॅग. ६ Anchor bolt : अँकर. ७ Sq. Headed bolt : चौरस माथ्याचा. ८ Hexagonal headed bolt : षट्कोनी माथ्याचा. ९ Tap bolt : टॅप. १० Claw bolt : क्लॉ. ११ Coach bolt : कोच. १२ Eye-bolt : आय बोलट. १३ Open-eye bolt: खुला आयबोलट.

१४ Straining bolt : ताण बोल्ट
१५ Handrail bolt : हँडरेल
१६ Espagnolette bolt : एस्पॅगनोलेट

**Screws**

१ Flat head : चपटया डोक्याचा
२ Ovel head : फुगीर माथ्याचा
३ Round head : गोल माथ्याचा
४ Handrail screw : हँड रेल
५ Multiple thread : मल्टीपल थ्रेड
६ Ratchet screwdriver : रॅचेट स्क्रू ड्रायव्हर
७ Boiler screw : बॉयलर स्क्रू

कील, वल्ली, सळी, खीट, बोल्ट, शब. अडसर लावण, खीळ घालणे, खिळणे. सुमारे चार फूट लांबीचा ओंडा. **–anchor** नाळनांगर. पहा Anchor bolt. **–head** बोल्टाचे डोके. **–rag**. पहा Rag bolt. **–rope** शीड फाटू नये म्हणून त्याचे काठाला शिवलेला बोल्टासारखा जाड दोर, शीडबंद. **–sprit** (गलबताचा) नाळदांडा. **Barrel bolt** टॉवर बोल्ट. **Draw-bolts**. पहा D. **Holding down bolts** पायातील बोल्ट. **Hook-bolts** आकड्याचे बोल्ट. **Bolting cloth** चाळणीचा जाड कपडा.

**Bomb** ध्वम्, बॉम्ब. **Bomber** बॉम्बफेकी विमान.

**Bond** संधा, बंद, बंध, सांखळी, मांडणी, गुंतावा, नमुना, चाक,

१. Chimney bond : चिमनी
२. Diagonal bonds : कर्ण
३. Dog tooth bond : डॉगटूथ
अ Through stone : दुतोंडा

४. Dutch bond : डच

५. English bond : इंग्लिश. ६. English bond : इंग्लिश. ७. English garden wall bond or Scottish bond : इंग्लिश गाडन वॉल किंवा स्कॉटिश.

८. Flemish bond : फ्लेमिश. ९. Flemish garden bond or Sussex : फ्लेमिश गार्डन किंवा ससेक्स.

१०. Garden wall bond : गार्डन वॉल
११. Facing bond : फेसिंग

१२. Heading bond : बंदांची. १३. Herring bone bond : हेरिंग बोन. १४. Hoop-iron bond : हूप आयर्न.

१५. Stretching bond : आडवी

१६. Quoin brick, Squint brick : कोपऱ्यांची वीट मांडणी.

भुज. एकमेकांशी बांधल्या जातील अशी विटांची मांडणी-रचना, कित्ता, सांधेमोड भरीव बांधकाम करण, रासायनिक आकर्षणाचे एक माप. **–resistance** संसक्तिजन्य प्रतिरोध, संधासक्ति, संधासंग. **–stone** बंद, बंध, हेदर. **–stress** संसक्तिजन्य प्रतिकार, संधा विकारण–विकारक. **–timber** आडव्या बांधकामात गुंतावा केलेले लाकूड काम. **Bonded warehouse** जकात वसूल होईपर्यंत सामान ठेवण्याची वखार. बंधक-माल गुदाम. **Bonding** लाकडाच्या दोन अगर अधिक पृष्ठांचे किंवा फर्दांचे इष्ट अशा संसक्त्याकर्षणाने होणारे एकजीवीकरण. विटांच्या मांडणीचे पुढील वेगवेगळे प्रकार आहेत.

Bond stone : हेदर

Chimney or Stretching **bond**, **Diagonal bond**, **Dutch bond**, **English bond**, **English cross bond**, **Facing bond**, **Single flemish bond**, **Double flemish bond**, **Heading bond**, **Herring bone bond**, **Hoop iron bond**, **Raking bond**.

**Bone-black** हाडांचा कोळसा.

**Boning in** दोन्ही टोकांस आधीच कायम केलेल्या खुंटयांशी सुसंगत अशा इष्ट उताराच, पातळीत व रेषेत काटेकोरपणे माथा व मध्य येईल अशा रीतीने मधल्या खुंटया मारणे. **Boning rods** ज्यांच्या साहाय्याने चालू कामात इष्ट

Boning rods : बोनिंग रॉड्स

उतार, पातळी व रेषा अगदी कांटेकोरपणे दाखविणाऱ्या खुंटया मारता येतात असा **T** गुण्याच्या आकाराचा तीन पट्टयांचा संच.

**Bonnet** बाष्पपात्राच्या (बॉयलरच्या) तोंडावरचे जाळीचे झांकण-टोपी. (भिंतीतील शेगडीत वाऱ्याचा झोत वाढविण्याकरिता धुराड्यावर केलेली छतासारखी टोपी) मेढेकोट, टोपीसारखे कोणत्याहि प्रकारचे त्राण-छत (वास पैप वगैरेवर केलेले). **Bonnet tiles**, **Ridge tiles**, **Arris tiles** ढापे.

**Book ends** पुस्ताकाधार, पुस्तके टेबलावर ठेवल्यानंतर दोन्ही बाजूंनी आधार देण्यासाठी लाकडी टेंकू.

**Boom** (जेथे पाणी उसळत असते तेथे गलबत येऊ नये म्हणून) समुद्रात पुरलेली काठी, बंदरात आडवी बांधलेली सांखळी, अगदी पुढचे त्रिकोनी शीड ताणण्याची तळकाठी, बोम, बम, मोठ्या गर्डरचा पाटा. **–of crane or derrick** ध्वजक.

**Booster** उर्जमान वाढविणारे किंवा कमी करणारे यंत्र.

**Booth** मामुली साधनांनी बांधलेली झोपडी-जत्रेतला गाळा.

**Borax** साहोगा, सवागी, टाकणखार. घनफूट वजन १०९ पौंड.

**Border** कंगोरा, कड, शीम, शीव, शिंव, सींव, पाळ, कांठ, वरवंडी, बॉर्डर, किनारा, सरहद्द. **–land** सीमेवरची जमीन, शीव. **–of field** मेड, मेंड, कुंपण. **Circular border** कड. **Coloured border** संजाब; रंगीत किनार. **Country or village border** सीमा, शीम, शीव, सरहद्द. **Ornamental border** मगजी. **Raised edge or border as of wells and tanks** गज, पाळ, वरवंडी, धड. **Unto the border** आसीमान्त. **Bordering pen** (नकाशाला) बॉर्डर काढण्याचे पेन.

**Bore** परिवेध, वाराही, भोंक, उभाघळ, छिद्र, रंध्र, बुराख, विंध. गोल छदनान पाण्यासाठी विहीर खोदणे, विंधणे. **–holes** गोलछेद. **Bored** विद्ध, भोंक पाडलेला. **Borer**, **Boring machine** छिद्रयंत्र, कोरणीने भोंक पाडण्याचे यंत्र. वेधणी, वेधण, वेधन-यंत्र. **Boring** भोंक पाडणे गोलछेदन, परिवेधन. कूपनलिका. **–machinery** भोके मोठी करण्याचे यंत्र. **–bar** वेधनाचे पाते बसविण्याचा दांडा. **–lathe** भोंक पाडण्याचा चरक. **–tool** कोरणी. **Business of boring holes** विंधकाम

**Boric acid** टंकिक-टाकण अम्ल.

**Boron** टंक, बोरान नावाचे बोरिक आसिड या संयुगात आढळणारे धातुरूपी मूलद्रव्य, टंकण, टंकातु.

**Borough** स्थानिक स्वराज्य असलेले शहर.

**Borrow-pit** चौकडी, खड्डा.

**Bosh** लोखंड किंवा बीड वगैरे गाळण्याच्या भट्टीची खालची निमुळती जागा. मुशीच्या खालचा निमुळता भाग. ज्या भांड्यात लाल केलेले लोखंड बुडवून थंड करतात ते.

**Boss** विशाल गड, पकड, तुंबा, नारडी (चाक किंवा कप्पीची), 'शाफ्टिंग' चा जाड केलेला भाग जेथे चाक बसवितात तो, (लांकडी छतावर बसविलेली फार रुंद) लाकडी फुले. कमावलेला चुना ठेवण्याचे भांडे-घमेले. पुढे आलेला नक्षीदार दट्टचा. **–tool.** तुंबा घडण्याचे हत्यार. **Bossed**, **Embossed** उठावदार नक्षीकाम केलेले.

**Botany** वनस्पतिशास्त्र, वानसीयशास्त्र. **Botanist** वानसिक.

**Bothy**, **Bothie** झोपडे, कामचलाऊ आवसा.

**Bottle jack** खालील भाग बाटलीसारखा दिसणारा दुमकळस. **Bottle green**, **Dark green** निंबुरडा, पिस्ताई. **Bottle neck** कूपीकंठ. (वांद्रा येथील पूल हा मुंबई बेटाचा कूपीकंठ आहे.)

**Bottom** तळ, बूड, तल. **–chord** तलज्या. अधःकोटक, निकोटक. **–contraction** तलसंकोच. **–fuller**, ऐरणीवरचे लोखंड वाढविण्याचे हत्यार. **–paint** (जहाजाच्या) तळास लावण्याचे चोपडान. **–tool** ऐरणीच्या भोकात बसणारे हत्यार.

**Boudoir** एकांतात स्वस्थ बसण्याची खोली, स्त्रियांची आपल्या इष्ट मित्रांना भेटण्याची खोली, खाजगी दिवाणखाना.

**Boulder** गुंडा, गुंडी, गोटा, टोळ, धोंडा, धोंड. **Boulder metal**, **Jungle metal** भुईटी खडी, जंगल मेटल. **Boulder stone** कारदगड, कारीचा दगड.

**Boulevard** दुतर्फा झाडे असलेला राजमार्ग.

**Bound** बन्ध. **–lower** अवबन्ध. **–upper** उद्बन्ध. **The lower bound** प्रावबन्ध. **The upper bound** प्रोद्बंध. **Bound and border** शींव मर्यादा, दांढ पेंडोळा, हद्द. **Bounds, four bounds** चतुःसीमा. **Bounded by** मर्यादित, परिमित, सीमाबद्ध, बंद.

**Boundary** सीमा, सरहद्द, मर्यादा, शींव, सींव, शिमा. **–post** हद्दीचा खांब. मटोले, मूळठोंबा. **–stone** हद्दीचा दगड, शींव धोंडा. **–stone on field bund** चिरा. **–stone of a village** भुयधोंडा. **Artificial boundary** कल्पित सीमा. **Defining or making**

**of the boundaries** चकबंदी. **Natural boundary** प्राकृतिक सीमा, स्पष्ट मर्यादा. **Raised boundary of a field** बांध, बंधारा, बांधारा. **Way or passage along a raised boundary** बांधवाट, बांधाटी.

**Boussenesq's formula** रस्त्यासाठी वापरण्याच्या साहित्याची जाडी काढण्याचे 'बौसेनेस्क सूत्र'.

**Bow** धनु, चाप, कमान. (गलबताची) नाळ, नाळेची बाजू. (विंधणे किंवा सामता गरगर फिरविण्याचा) गज, वांकडा दांडा. (क्षितिजापासून सूर्याची उंची मापण्याकरिता) वर्तुलपाद यंत्र. (लांकडाच्या लांबीतला) बांक. **–anchor or Bower** नाळनांगर. **–drill stock** टोंपण, सामता, तरोंपण, लोंड. **–for D. S.** कसणी. **–hand** डावा हात. **–knot** सुरगांठ. **–line** (चौकोनी शिडाच्या मध्यापासून) नाळेकडे जाणारा दोर. **–oar** नाळेकडचे वल्हे. **–pen or Drawing pen** कमानदार रेषा लेखणी, शाईने रेषा काढण्याचे कमानदार पेन. **–saw** सांगाडी करवत ; हिचे पाते पातळ व (स्प्रिंगचे) कमानीचे केलेले असते; हिचा उपयोग वर्तुळाकारात अगर दीर्घवर्तुळाकारात असलेली वाके कापण्याकडे करतात. **–sprit** (गलबताचा) नाळदांडा. **–string** ज्या, धनुष्याची दोरी, प्रत्यंचा, मौर्वी, गुण, चिल्ला. **–string (Girder's) bridge** प्रत्यंचा पूल, धनुष्कपूल. **–string girder** धनुर्निष्कम्भ, धनुष्याकृति गर्डर. **String truss-truss** धनुष्क कैची-सारास. पहा Belfast truss. **–tell** पाऊण वर्तुळाइतक्या बहिर्गोलाईचे नॉर्मन थाटाचे नक्षीकाम. **–window** निमगोल-अर्धवर्तुलाकार खिडकी. पहा Bay window. **Bold, Bluff bow** रुंदनाळ. **Bows, Bow Compasses** शाईने कंस काढण्याचा कमानदार कंपास. **Lean bow** अरुंद नाळ. **Bow's notation** बाऊची आलेखन पद्धति. **On the bow** नाळेच्या अगदी समोरच्या बिंदूपासून ४५° चे आंत.

**Bower** लतामंडप.

**(To) Box the beam** बहाल (पेटीसारखे) बांधून काढणे. **(To) Box the compass** दिशांचे बत्तीस बिंदु दाखविण्याकरता कंपासाचा काटा अनुक्रमाने फिरविणे. **(To) Box off** खाते पाडणे. **Box bolt** ज्या बोलटाचे माथे गोल गाळयाच्या आत बसते तो. **Box column** चौरस किंवा लंबचौरस पेटी खांब. **Box culvert** लंब चौरस तोंडाची मोठी मोरी. **Box drain** लंब चौरस तोंडाची मोरी. **Box girder** मध्ये पोकळी व भोवती दोन उभार व दोन पाटे यांचा लंब चौरस आकाराचा बिडाचा पेटी गर्डर-तुळई, पेटिका-निष्कम्भ. **Box gutters** शिशाचे पत्रे बसवून केलेले छप्पराचे चौरस 'पेटी गटार', प्रवहण पेटिका. **Box hardening** लोखंडाचे दागिने किंवा डाग पेटीत घालून त्यांचा पृष्ठभाग कठीण करण्याची रीत. **Box nut** एक बाजू बंद असलेली चाकी ; (त्यामुळे बोलटाच्या भोकाचे रक्षण होते व दिसायला सुबक दिसते. **Box plate girder.** पहा Box girder. **Box spanner, Box key** बाकसपाना, नळीवजा टोकाचा पाना ; याचे टोक चाकीत घट्ट बसून टॉमीबारने चाकी फिरविता येते ; साधा पाना लावता येत नाही अशी (गोल गाळयात बसणारी) चाकी फिरविण्यास ह्या सोईचा असतो. **Box stairs** दोन्ही बाजूच्या भिंतीत (तरफावाचून) बसविलेला जिना. **Box wood** कोरीव नक्षीकाम, फर्निचर वगैरेंच्या कामाचे फिके पिवळे टणक लाकूड, याचे हत्याराचे हातगे, मुठी व मोजपट्टया करितात. **Boxwrench** बाकस रिंच. पहा Wrench. **Miter box** कार्निसचे सांधे कापावयाचा ठोकळा. **Pelmet boxes.** पहा P. **Boxed heart** सबंध लांबीत केवळ गाभ्याचाच भाग असावा अशा रीतीने करवतलेला किंवा तासलेला लाकडाचा तुकडा. **Box shaped float.** पहा Margin trowel. **Box's formula** नलिकांचा 'घार्षणिक लुप्तांश' काढण्याचे 'बॉक्स सूत्र'.

**Boxite** 'बॉक्साईट' या खनिजापासून ॲल्युमिनियम तयार करतात.

**Boyancy of water** पाण्याची उद्धारक शक्तिप्लवताप्लाविता.

**Boyle's Theory** 'बॉइलचा सिद्धांत' तपमान कायम असल्यास कोंडलेल्या वायूवरील दाब व त्यांचे घनफळ ही नेहमी व्यस्त प्रमाणात असतात ; म्हणजेच दाब व घनफळ यांचा गुणाकार नेहमी कायम असतो.

**Brace** ताण, आधार, भोक पाडण्याचा सामता, वाकडा सामता, डोल (ळ) मीट, पकड, कैची, नघ्री. मुंढा मारणे, पकड लावून-आधार देऊन मजबूत करणे, आवळणे, ओढून घेणे. **Braced** ताणलेला, ताण दिलेला. **Braced arch** तणाव्याची कमान, कैची कमान. **Bracer** कसणी, पट्टा. **Bracing** नघ्रावली.

**Bracket** साधी किंवा नक्षीदार माकडी-तीर. बेळके, कंस, लांकडी धनुकली, अर्धी मेहेराप. (घर्षणाच्या धातूच्या बाहेरील) ओतीव अथवा घडीव लोखंडी कंस. **–arcuate** मेहेरपी कंस, धनुषकंस, जिन्याच्या मधल्या तरकांना जोडून टप्यांना आधार म्हणून दिलेले तीर. **–circular** वृत्तकंस. **–foot** मेहेरापीचा पाया. **–moulding, brace, double ogee** दोन विनिकूंच्या बहिर्गोलांची कंसासारखी नक्षी. **–insertion of** कंसीकरण, कंसात घालणे, कंसन्यास. **–rectangular** चौकटी-चतुष्कोण कंस. **–removal of** कंस उडविणे-काढणे, विकंसीकरण. **Centre bracket** केंद्रकंस. **Knee bracket** वांकडा कंस.

**Brad** टेकस, लहान जातीचा खिळा, सुरसा, तुरई, गुलमेख, मकुड्याचा खिळा.

**Bradawl (lathe work)** भोंक पाडण्याचे हत्यार, बराडोल.

Bradawl : बराडोल

**Brae** टेकडीची बाजू-उतरण.

**Brahma-K a n d a** ब्रह्मकांड, लंब चौरस आकाराचा खांब.

**Brake** घर्षणी, गतिरोधक, वेगमोड, घसणी, ढकली, घोरपड, (एंजिनाचे) घर्षणमापक यंत्र, बंबाचा दांडा-मूठ. **–horse power (B. H. P.)** उपलब्ध-प्रत्यक्ष अश्वशक्ति. पहा Horse power. **–van** आगगाडीचा ब्रेक डबा. **–wheel** वेगमोडीचे किंवा गतिस्तंभकाचे चाक. **Vacuum brake** निर्वात गतिस्तंभक.

**Bramah's press** ब्रामाचे दाब-दाबक यंत्र, दाब-जलयंत्र ; शोधक लंडन येथील जोसेफ ब्रामा (इ. स. १७४८-१८१४).

**Branch** शाखा, अंग, उपनदी, फांटा, विशाखा-विशेष शाखा. **–road** शाखापथ, मुख्य रस्त्याची शाखा. **–canal** पोट कालवा. **–shears** (झाडांच्या) फांद्या कापण्याची कातरी.

**Brand** छाप, व्यापाराची खूण, विशिष्ट खूण, विशिष्ट खूण डागणे. **Brand-branding iron** डागणी शिक्का.

**Brass** पितळ, पित्तळ ; हा धातु प्रमुखत: तांबे व जस्त (झिंक) यांच्या मिश्रणापासून तयार होतो. ह्यात तांबे ६० ते ७० टक्के असते. त्याजवर थंड घडकाम हवे तसे होऊ शकते. घ. फू. वजन ५०४ पौंड (८० तांबे: २० जस्त= ५३७ पौंड. ५० तांबे: ५० जस्त=५१२ पौंड). **–wire** पेंचक पितळेची तार.

**Brash wood** अगदी क्षुल्लकशी ढलपी काढण्याने मोडणारे लांकूड.

**B. R. C. fabric (British Reinforced Concrete fabric)** विजेच्या साहाय्याने जोडगिरी करून ३″×१२″ च्या खिडी ठेवलेली तारेची जाळी ; काँक्रीट, रस्ते, मजल्यांचे ढापे वगरेच्या कामात हिचा प्रबलनासाठी उपयोग होतो.

**Braze** झाळणे, (पितळेचा) पक्का डांक लावणे-देणे, पितळेने मढविणे, कठीण करणे. **Brazier, Brasier** कांसार, कांस्यकार. **Brazen** पितळेचा डांक लावलेले. **Brazing** तांबे व पितळ या धातूंच्या वस्तू डाग देऊन सांधण्याची क्रिया. **–metal** डांख करण्याची धातु.

**Breach** भगदाड, भगदळ, भगाड, भोंकसा, खिंडार-रे, भदाड, भगदड, खांड. सांध-खिंड पडणे-पाडणे. (जहाजावर समुद्राची) लाट आदळणे-फुटणे. लाटेचे पाणी, मोठी लाट. **Large breach** खांडार.

**Breadth** रुंदी, विस्तार, रुंदपणा, व्यास, रुंदावा, विस्तृति वितति, प्रमाण. **–of stone** पट्टी. **Breadth ways-wise** पन्हयाने, रुंदीच्या बाजूने. **To increase in breadth** रुंदावणे. **A single breadth** पाट, पट्टे, पाटग, पाडगे, अटपळे. **Of a single breadth** एकवरी. **Hand breadth** चोंगा, चोंगी, चौगा.

**Break down** वेरकाम करून ओंडक्यांचे सरळ मोठ्या आकाराचे लांब व चिरीव तुकडे करण्याची लांकूड वापरण्या- पूर्वीची तयारी. **Break joint** सांधमोड, जोडभंग. **Break neck speed** मानमोडी, घातक मुसंडी. **Break pressure chamber** जलशोधकातील दाबमोडी कुंडी. **B. N. rock** सुळक्यासारखा तुटलेल्या कड्याचा. **Break water** ढकशी, थोप, बांध, बंधारा, जलोर्मीशक्तीभंजक, (पाणी थोपविण्याकरिता) केलेला बांध-भिंत. **Breaking strength** कणन सामर्थ्य. **Breaking stress** ताण किंवा दाबाने मोडण्यास लागणारे बल, भंग विकारण, कणन प्रतिबल. **Breaking-up machines** कापसाचे गठ्ठे मोडून बारीक करणारी यंत्रे. **Breaking weight** कणन भार. **Breakage** फूटतुटीबद्दल सूट-मोबदला, 'सळई पंचोत्री'; विटा व कौले फूटतुटीकरिता म्हणून शेकडा सहा नग स. पं. म्हणून मोफत मिळतात.

**Brest-breast summer, Bressummer, Bressomer** आधार-काठी, आधारबहाल (ह्यावर छपराचा सर्व भार असतो, खिडकीवर-दरवाजावर बसविलेल्या छावणीप्रमाणे आधारबहाल छपराचा सर्व भार तोलते). **Breast** छाती-इतक्या उंचीवरील भिंतीचा भाग. **–beam** ज्या रेलवरून तयार झालेले कापड जाऊन क्लॉथ रोलरवर गुंडाळते ती रेल. **–rail** छातीइतकी उंच रेल, छाती इतक्या उंच बांधलेल्या भिंतीवरची रेल. Bressummers : जोडबहाले. **–wall** छातीइतकी उंच आधारभिंत किंवा वरवंडी, उरस्का, उरोभित्ति. **–wheel** (पाणचक्कीमधील) मुख्यचक्र ; ही चक्की फक्त पाण्याचे जोरावर चालते व ती अर्धी पाण्यात असते. **–work** संरक्षणाकरिता घाईने बांधलेला छातीइतका उंच तट, वरंडी, वरंड.

**Breathing hole** उच्छ्वास, उश्वास, झरोका.

**Breccia** बहुकोन संधायित प्रस्तर.

**Breeches pipe** उलटचा Y च्या आकाराचा जोडनळ.

**Breeze** कोळशाची राखाडी, भट्टीतली कोळसी वगैरेस **Furnace ashes, Coke breeze, Pan breeze, Furnace coke-dust, Refuse from coal or coke, Clinker** ही नावे आहेत ; विटा भाजण्यास

यांचा उपयोग होतो. **–concrete** तीन भाग कोक ब्रीझ, एक भाग रेती व एक भाग सिमेंट यांच्या मिश्र-मिश्रणाचे काँक्रीट.

**Bressumers** ९"×३" किंवा ११"×३" आकाराच्या फळ्या बोलटांनी जोडून केलेली बहालें.

**Brick** वीट, इष्टका, विटांची ऐष्टक. वीटबंदी करणे. वीटबंदीचा करणे, विटांनी बांधणे. घनफूट वजन १५० पौंड. **–arch** विटांची कमान, जूड. **–axe** कमानीच्या विटा तासण्याची दुपाती तासणी. **–bat** विटकर, विटकूर, रोडा, टोला, बडा. **–bat concrete** रोडयांचे काँक्रीट, कोबा. **–bat pavement** कुट्टिमा. **–clay** विटेची माती. **–dust** विटांचा चुरा, सुरखी. **–earth** विटा करण्याची माती. **–field** विटा तयार करण्याची जागा. **–kiln** विटांची भट्टी. **–layer** गवंडी, गौंडी-ड्या, गवंड्या. ऐष्टिक. **–laying** विटा घालणे. **–maker** विटा-इटा करणारा कुंभार, विटवाल, इष्ट (इष्टि) काकार. **–masonery** विटांचे बांधकाम, विटकाम, इष्टिकाचित्य. **–mould** इटाळे, विटाळे, मोपाळे. **–nogging** दाशाचे काम. **–nogged partition** दाशाची भिंत. **–on end, –edge laid upright** खंडजा, खरंजा. **–partition** विटांची पडदी. **–paving** वीटबंदी. **–red coloured** विटेप्रमाणे तांबडा. **–trimmer.** पहा Trimmer arch. **–veneer** बांधकामाला विटकामाचे दर्शनी काम करणे. **–work** विटकाम, विटबंदी, ईटबंदी. **–works** विटांचा कारखाना. **Air bricks.** पहा Air bauxite bricks भट्टीच्या विटा. **Bullnosed bricks.** पहा Bull nose. **Burnt, Kiln burned, Baked bricks** पक्क्या विटा, पक्वेष्टका. **Cut bricks.** पहा King closers, Queen closers, Bats, Snap headers, False headers. **Fire bricks** आगविटा. घ. फू. वजन १३७ पौंड. **Frame of a brick for carrying earth** मंची. **Hand-made bricks** हातविटा. **Machine-made bricks** यंत्राने बनविलेल्या विटा. **Overbrunt bricks** खंगर, दग्धेष्टका. **Paving bricks** फरशीच्या विटा. **Purpose made bricks** खास विटा. **Reinforced brick work** सलोह विटकाम. घ. फू. वजन १२६ पौंड. **Splayed bricks.** पहा Splayed. **Sundried bricks** कच्ची वीट, मोप, मोप, मडा. **Table brick** ठोकळी वीट. **Vitrified brick** खंगर, दग्धेष्टका. **Vitrified excrescence upon a brick** किटण. **Brick and a half wall** १४ इंची–दीडविटी दिवाल-भिंत. **Brick and a stud.** पहा Bricks nogging.

Brick mould : इटाळे

**Bride well** तुरुंग (लंडन येथील **St. Bride's well** नजीकच्या राजवाड्यावरून).

**Bridge (passage)** जहाजावरील नियंत्रण ठेवण्याची जागा, पूल, सेतु, दादर, सैतवम्. **(Structure)** उत्तार. (वर) पूल बांधणे. **–board.** पहा Notch board. **–head** पुलावरच्या शेवटाची तटबंदी. **–engineering** सेतुवार्तिक. **–laying** पूलबंदी. **–of boats** गलबते खुटवून त्यांवर बांधलेला पूल. **–of crude materials** साकू. **–stone** गटारावर किंवा अरुंद गाळ्यावर बसवता येण्याजोगा दगड. **A disposition of bridges.** पहा पूलबंदी. **Deck bridge.** पहा Deck. पाटन पूल, सपाट पूल, पृष्ठवाही पूल. **Double-decker bridge** दुमजली पूल. **Draw bridge** काढता घालता पूल. **Fixed bridge** सांकव. **Hanging bridge** झुलता पूल. **Over bridge** रेलवेच्या सडकेच्या वरचा पूल, वरपूल, वलांडपूल. **C. F. deck (bridge), Through bridge.** पहा T. **Wooden bridge** लाकडी पूल, लक्कड पूल. **Bridging** वर पूल बांधणे. **Bridging joist** कडीपाटाचा बरोद-बडोद-कडी.

१. Plate girder bridge : पाटा-बहाल
२. Lattice "N" girder bridge : "एन" बहाल
३. Lattice girder bridge (Warren) : "वॉरन" बहाल.
४. Swing bridge : दोलन
५. Bascule bridge : उघड झाप
६. Suspension bridge : झुलता
७. Cantilever bridge : अर्धबहाल

८. Draw bridge. : उचल. ९. Pontoon bridge. : पान्टून १०. Timber bridge. : फळयांचा (कमानदार).

**Bridle or Saddle joint** दुजीभी जोड. पहा Joint. **Bridle path-road-way** अश्वपथ, पायवाट किंवा घोडेवाट. **Bridle structure** लगामासारखी वास्तूची रचना.

**Brig, Brigantine** एक प्रकारचे दोन शिडांचे गलबत. चांचे लोकांचे गलबत, लघुगणितांच्या शोधक 'ब्रिग्स' याने सुचविलेला १० : १ हा गुणोत्तराचा एकं.

**Brightness** उजळा, उज्ज्वलता, उजळपणा, ओप, जिल्हई, चकाकी, चकासन, भास्वरता. **Brimstone** गंधकपाषाण, गंधकाश्म.

**Brinded, Brindled** बहाळा, बांडा, कसरा.

**Brine** खारे पाणी.

**Briquette** कोळशाच्या राखाडीची वीट, लहान आकाराची वीट.

**Britania metal** या मिश्र धातूचा विशेष उपयोग चमचे, काटे वगैरेसारख्या वस्तू तयार करण्याकडे होतो.

**British Standard Specifications ; B. S. S.** ब्रिटिश निर्दिष्ट-प्रमाण, मान. **British thermal Units, B. th. U.** उष्णतेचा एकं, ओष, ब्रिटिश-उष्मा-मात्रक, ऊष्मा एकक. एक पौंड पाण्याचे उष्णतामान ६० फॅ. अंशापासून ६१ फॅ. अंशाइतके वाढविण्यास लागणारी उष्णता.

**Broach** बारीक सामता, गिरमीट, चिरणी, आड टांकी, दांडा शंकु, मनोऱ्याचा कळस, फांसा, अडकवण. रायमर ड्रिल. **–post.** पहा King post. **–spire** इंग्रजी चर्च प्रमाणे (वरवंडी खेरीजचा) मनोऱ्यावरील अष्टकोनी सूच्याकार कळस. **Broached.** पहा Punched dressing.

**Broad** रुंद, रुंदट, विस्तीर्ण, चौखुंदा. **–arrow** बाणासारखी (↑) ही खूण इंग्रजी अमदानीत सरकारची मालकीदर्शक खूण असे. **–crested weir** विस्तृत वीरक, वृंदवीरक. **-guage** मोठी-बडी-रुंद गेजची (खुला गाळा ५′–६″ चा असलेली) रेलवे लाईन. **–irrigation** नैसर्गिक पाण्याऐवजी शहरातल्या घाणपाण्याने होणारे क्षेत्रपायन.

**Broadcasting** परिक्षेपण, प्रसारण, ध्वनिप्रक्षेपण. **–studio** परिक्षेपण कलास्थान. **Broadside** गलबताची जलरेषेवरील रुंदट बाजू, सिलिंडराचे कांठ वांकविण्याचे हत्यार. **Broadwise** आडवा, कडेकडून.

**Bromic acid** ब्रमिक अम्ल. **Bromine** ब्रम. **Bromoform** ब्रमपुत्तिक.

**Bronze** कांस, ब्रांझ, तांब्याची आणि कथलाची मिश्र धातु (ओतकामास योग्य असे) कांसे, या धातूत शेकडा १॥ या प्रमाणात फॉस्फरस मिसळण्यात येतो म्हणून ह्यास फॉस्फर ब्रॉन्झ असेही म्हणतात. घ. फू. वजन ५३२ पौंड. **–age or period** ब्रांझयुग ; लोहयुग आणि पाषाणयुग यांमधील काल. **–green** बिरंजी, हिरवा. **Bronzed** ब्रॉझचा मुलामा दिलेला. **Bronzy** ब्रॉझचा, बिरंजी.

**Brog** टोंचा.

**Brook** पर्या, पऱ्हया.

**Brown** उदी, उदी रंगाचा, बदामी, तपकिरी, मुगदुमी, बभ्रु, उदी रंग, घनसांवळा रंग, तपकिरी रंग, उदी रंग देणे, गहिरा तांबूस रंग देणे. **Brown and sharpe wire gauge** जंतरपट्टी ; हिने तारांच्या जाडीचे ०.४६″ पासून ०.००१२४″ पर्यंतचे मेज घेता येते व ते अंकांनी दर्शविले जाते. **Brownie brown** चकचकीत. **Dark brown** घनसांवळा, कपिश, खैरा. **Light or Reddish brown** भोरा, भुर, भोऱ्या, मळचा. **Rich brownish yellow** खूब बदामी पिवळा, अति तांबूस पिवळा. **Brownish yellow** तांबूस-बदामी पिवळा. **White brown, Root coloured** कंदी. **Brown coal** लिसाइट, साध्या कोळशापेक्षा काष्ठांश संबंध जास्त दिसून येणारा कोळशाचा उच्च प्रकार. **Brown spar** डोलोमाईट (अशुद्ध चुनखडी) च्या काही प्रकारांना त्यांच्या तांबुसपणामुळे हे नाव दिले आहे.

**Bruge's formula.** पहा Crimp and Bruge's Formula.

**Brush** ब्रश, कुंचा.

**Brush wheel** बरास चाक, घर्षणाच्या योगाने चालणारे चाक. **–discharge** अदृश्य विसर्ग.

**Bubble tube, Sprit glass** साधन, पाणसळीतील कांचेची नळी.

**Bucket** द्रोणी, हौद, ओसाड बांधाच्या पायथ्याला दिलेली गोलाई (मलभित व बांधाचा उतार यांत संक्रमण वक्र निर्माण करून पडत्या पाण्याला इष्ट वळण देण्यासाठी दिलेली). **–wheel** पायरहाट.

**Budding knife** झाडांचा (गुलाबाचा) डोळा भरण्याचा चाकू.

**Budget estimate** निकल्प-निमान.

**Buff** गहिरा-फिक्का, पिवळट रंग, हिरवट किंवा पिवळा करडा, बफ, बफ रंग देणे. **–wheel stick** चकाकी किंवा उजाळा आणण्यासाठी कुरुंदाचा (Emery) चूर लावलेले चाक किंवा काठी.

**Buffer** प्रतिरोधक, संघर्षण प्रतिबंधक, आघातशोषक, दोन वस्तूंमध्ये होणारा आघात नाहीसा करण्याचा प्रतिबंध, आघात प्रतिबंधक तबकडी, ठोकर, बफर. **–stop** ठोकर.

**Buffing knife** घोंटणी.

**Build** बांधणे, रचणे, उभारणे, बांधण्याचे काम-धंदा करणे, घनता, घट्टपणा (of a paint or varnish film). **Builder** घरे बांधणारा.

**Building** आलय, भवन, इमला, इबला, इमारत, वास्तु, वेश्म, वेश्मागार. बांधणे, रचणे. बांधणी, बंदिस्ति, बंदिस्त. **–composed of four slip** चौसोपी. **–having a roof of two slopes** दुपाखी, दुमोळी. **–having four slopes** चौपाखी, चौमोळी. **–of two rooms lengthwise.** दुघई, दुवडी. **–of three rooms lengthwise** तिघई, तिवडी. **–of four rooms lengthwise** चौघई, चौवडी. **–timber** बांधकामाचे लांकूड. **Any long building such as a barrack** अलंग. **Style of a building** बांधणी. **A house or wall built loosely** डगळींव. **Building over the gate of a city** गोपुर. **Cost of building, Mode of building** बांधणावळ. **Division of a building** खण, गस्त. भद्र. **Large building** वाडा. **A long building** सोपा. **A long narrow building, Master builder** मेस्तरी. **Jerry** दांडेसाळ, दांडळ. **Builder.** पहा J. **Builders of some other forms or construction** सावंत्राई, शृंगारी, हजारी. **Wood-work of a building** काजाणू, लांकडी काम. **Built** बांधण, बांधणी, बांधा. **Built-in beam** टोके बंदिस्त असलेले बहाल. **Built-in cupboard** भिंताडी कपाट, पक्के बसविलेले कपाट. **Built-in furniture** भिंताडी सरंजाम-असबाब. **To build in** इमारतीने कुडणे. **Made built** बांधीव. **Built up** वेगवेगळे भाग रिबिट करून किंवा डाख वगैरे लावून बांधलेले-जोडलेले. **Bukranium** गोमुख.

**Bulbous** कंदाकृति. **Bulb (of a thermometer)** बुध्न, बुधली.

**Bulk carriers** सुटा माल नेणारी जहाजे. **Bulk concrete.** पहा Mass concrete. **Bulk head** पाणी अडविण्याकरिता केलेले लाकडाचे किंवा दगडाचे बांधकाम-भित. **–modulus** आकारगुणांक. **Bulkage** फुगवटा, फूग, फुलावा. **Bulking value** वस्तूच्या वजनाच्या एकमूचे घनफळ; पौंडाचे अमुक गॅलन किंवा किलोग्रामचे अमुक लिटर.

**Bulldozer** खणलेली माती सुपलीसारख्या भल्या रुंद पात्याने ढकलीत नेत नेत जरूर त्या ठिकाणी व पातळीत सारखी पसरणारे यांत्रिक वाहन. **Bullock-pass** बैलघाट. **Bullock-road** बैलवाट, बैलरस्ता, बैलमार्ग.

**Bull-drawn leather bucket** मोट. **Bull's eye** झरोका, गवाक्ष. **Bull's eye arch** वाटोळी किंवा लंबगोल खिडकी किंवा गवाक्ष. **Bull-head tee** रुंद माथ्याचा (पायापेक्षा) T. **Bull-header** एका कोपऱ्यास गोलाई दिलेली वीट. **Bull-headed rail** वरचा किंवा खालचा कोणताही माथा करण्यासारखा जाड रुळा. **Bull nose** गोल कोपरा असलेली खास बनविलेली वीट. **Bull-nosed step** एका टोकास अर्धवर्तुळ किंवा वर्तुलपाद आकाराची तळाची पायरी. **Bull set** वज्रतुंड, दगड कामास उपयुक्त असे छिनीसारखे हत्यार.

**Bulwark** बुरूज, तटबंदी, कोटबंदी, बुरूज बांधून बंदोबस्त करणे.

**Bum-boat** किनाऱ्यापासून दूर अंतरावर असणाऱ्या जहाजावर अन्नसामग्री नेणारी लहान व रुंद होडी, बांबोट.

**Bundling press (yarn)** सुताचे लहान गठ्ठे बांधण्याचा सांचा, आटयांचे गठ्ठे बांधण्याचा सांचा.

**Bund** धरण, बांध. **Earthen boundary heap on field bund** ऐरण. **Main bund** सरबांध. **Small field bund** तुंबा.

**Bunk** निजण्याबसण्याची लांकडी पेटी; हिचा उपयोग दिवसा बसण्याला व रात्री निजण्याला होतो, इन्धनाचे खुराडे. **Bunker** पेटारा, कोळसे वगैरे ठेवण्याची पेटी.

**Bunsen-burner** बुनसनज्वाळ ; रासायनिक प्रयोग-शाळेत वापरण्याचा बन्सनचा दिवा (**R. W. Bunsen** रसायन शास्त्रवेत्ता याच्या नांवावरून).

**Buoy** तरते, बोयरा (समुद्रामध्ये खडक दाखविण्याकरिता) पाण्यावर तरंगणारे शंकु. तरता-तरंगत ठेवणे-राखणे-तरविणे, तरंगविणे.

Buoy : बोयरा

**Buoyance** तरतेपणा, तरणशीलता, तरणशक्ति, तरणधर्म. **Buoyancy** उद्धरणशक्ति, ऊर्ध्वमुखदाब, प्लवनशक्ति, प्लावकता, समुत्साह, उत्साहधर्म. **To mark out by buoys** बोयरे लावणे. **Buoyage** बोयऱ्यांची रांग.

**Bur, Burr** वोम, होम, बाहेर निघालेला कच.

**Bural** अश्माचा मिश्रधातु.

**Burette, Pipette** द्रवमापिका, मोजनळी, द्रवमापक नलिका, अंशांकित नळी.

Burette, Pipette ; द्रवमापिका

**Burj** बुरूज, टावर. **Burjee** बुर्जी ; साठमारीच्या रंगणात खवळलेल्या हत्तीशी झुंज देणारास बचावासाठी शिरता येण्याच्या सोईचे वाटोळे बांधकाम.

**Burn** ओढा, नाला, ओहोळ. **Burner** जाळमुख, खोळ, वातीचे घर.

**Burnettizing** जस्तीकरण.

**Burning point** (उडून जाणाऱ्या तेलाचा) ज्वलनबिंदु.

**Burnouli's number** बरनोलीची संख्या. **Burnouli's series** बरनोलीची श्रेढी (ह्या संख्यांच्या श्रेढीचा शून्यलब्धिनामक गणित प्रकरणात विचार केला आहे).

**Burnt clay blocks** (दग्धक्लव) खंगरी ठोकळे. **Burnt sienna** 'जले सयीना' रंग. पहा Sienna. **Burned-burnt umber** 'जले अंबर' रंग.

**Burr.** पहा Clinker.

**Burrock** जाळे (मासे पकडण्याचे) लावलेल्या बाजूस पाण्याचा प्रवाह वळवण्यासाठी घातलेला लहान बांध.

**Bush** बूच, लाट (Shafting) ज्यात फिरते ती घर्षण धातूची नळी, आंबवण, आमण. **–hammering** टाकी लावून कंक्रीट खरबरीत करणे. **–hammered concrete** टाकी लावून खरबरीत केलेचे कंक्रीट. **–metal** घर्षण धातु, कठीण पितळ, कांसे (खोबळ्यात किंवा पेटीत फिरणारा यंत्राचा भाग या धातूचा करतात). **Bushing** मोठ्या व्यासाची नळी लहान व्यासाच्या नळीस जोडणारे तोंड.

**Bushel** १.२८ घनफूट. आठ गॅलनांचे कैली माप-मापाचे पात्र, वसूं, विडी.

**Buss** दोन डोलकाठ्यांचे लहान मजबूत गलबत.

**Bust** अर्धचित्र.

**But** स्वैंपाकघर, बाहेरील खोली.

**Butane** दधुन, चतुष्केन.

**Butt** निशाण, लक्ष्य, संधानबिंदु, तोदा (तिरंदाजाचे नेम मारण्याचे स्थान). शिंगेचे टोक. खोड, बूड, बुडखा. मर्यादा, सीमा, हद्द. मोठे पिंप. निशाणामागील मातीचे टेकाड. टोकास टोक भिडविणे. **–hinges.** पहा Hinge. **–joint.** पहा Joint. **–shaft** तीर. **Beer butt, Sherry butt** १०८ गॅलनचे पिंप. **Wint butt** १२६ ग्यालनचे पिंप.

**Buttery** कोठी, दुभत्याची खोली.

**Butment, Abutment** टेका, पुस्ती, धिरा. पहा Abutment.

**Butte** टेकडी, टेकाड.

**Butterfly nut.** पहा Wing nut.

**Buttock planes** जहाजाच्या आडव्या छेदाची पातळी ; जहाजाचे घनफळ काढण्यास हिचा उपयोग होतो.

**Button rivets** बटना सारख्या माथ्याच्या रिबिटा. **Buttons (of wood to fasten doors, etc.)** चिमणी. **–to venetians** चिमण्या.

**Buttress** टेकू, धिरा, पुस्ती, पुस्तीची भिंत, पर्डभिंत, धीरिका. मच्छ, पुस्तवान, धिरासा. टेका देणे. **–thread screw** एक बाजू चौरस व एक बाजू तिरपी असलेला आटयाचा स्क्रू (मळसूत्र). **Flying buttress** दुसऱ्या कमानीस आधार देणारी कमानदार पुस्ती.

Buttress: पुस्तीची भिंत

**Butyric acid** घृताम्ल, दधिजाम्ल, चतुष्केनाम्ल.

**Butyryl** दधिलिल.

**By** ने, नी, लांबी, रुंदी किंवा उंची दाखविताना हा शब्द वापरतात ; जसे **A room twenty by ten** भाजित. **–corner** कोनाडा. **–lane or street** आडगल्ली, चोरगल्ली, आडरस्ता. **–pass** उपवाट, पळवाट, शाखांतर. **–pass condenser** (प्रवाह प्रतिकारक) धारणी. **–pass road** एरव्ही शहरातून जाण्याऐवजी शहराबाहेरून काढलेला रस्ता. **–passage** बाजूची वाट. **–path or road or way** पाऊलवाट, आडवाट, आडमार्ग, आडरस्ता, चोरवाट, गूढ मार्ग, गल्लीकुची. **–place** एकांताची जागा. **–radio** संवहद्वारा. **–product** दुय्यम निपज, उपनिष्पन्न. **–room** खाजगी खोली. **–town or village** काणी पेठ. **–job or work** आडकाम, अडप झडपकाम, किरकोळ काम.

**Bye-wash** परिवाह, अवसरा, वसर, ओसरा.

**Bye-way.** पहा By way.

**Byre** गाईचा गोठा.

**Byzantine architecture** पांचव्या शतकात कॉन्स्टँटिनोपल (पूर्वीचे बिझेंटिअम) येथे प्रसार पावलेले व अजूनही पूर्वेकडील किंवा ग्रीक चर्चमध्ये आढळत असलेले 'बिझंटाईन शिल्प'.

# C

**C** रोमन आंकड्यात शंभर ह्या संख्येऐवजी वापरतात. जसे:– **C=100, CCC = 300.** कायमची संख्या-पद **(A constant).**

**Caaba** मुसलमान लोकांच्या मक्केतील अतिपवित्र मशिदीतील आग्नेयी बाजूचा काळा दगड, 'काएबा' नांव असलेली सदर मशीद.

**Cab-tyre sheathing** एकेरी, दुहेरी किंवा तिहेरी पिळाच्या तारांचे दोरखंडावरील शिशाचे किंवा रबर गंधकाच्या मिश्रणाचे वेष्टन.

**Cabin** चालू कामावरील फळ्यांची खोली-खण-केबिण. रेल्वेवरील सांध्यांच्या दांड्यांची खोली, (जास्त भाडे देणाऱ्या उतारूंची गलबतातील) खोली, खोपट, झोपडी, कमरा. **–hook** पवनकडी.

**Cabinet** नकशीदार खणांची पेटी, खानेदार पेटी, मंजूषा, मंत्रगृह. **–drawing.** पहा 'Oblique drawing' व Cabinet projection. **–maker** नकशीदार पेटचा व इतर लाकडीकाम करणारा सुतार, मंजूषाकार. **–projection** भरीव आकृतीची एक बाजू कागदाच्या पातळीत व काटकोनातल्या दुसऱ्या बाजू पंचेचाळीस किंवा तीस अंशांनी पण अर्धप्रमाणात दाखविलेले प्रक्षेपण. **–ware** पेटचा, खुर्च्या, टेबले वगैरे सामान. **–work** गृहोपयोगी लाकडी सामान, उपस्कर.

**Cable** दृढ रज्जु, लंगरदोर, वहावळ, तारांचे दोरखंड, कुरुम, तारदोर, वज्रदोर रज्जु (हा सुमारे ६०७ फूट लांब असतो व हा लोखंडाच्या कडयांचा किंवा तागाचा केलेला असतो). रक्षक पदार्थाने मढविलेली पोलादाची किंवा तांब्याची विद्युत्-संदेश तार, सामुद्रीयतार, पाण्यातील तार, जाड दोरासारखा काढलेला पिळदार कंगोरातोडा, पिळदार दोरखंडासारखे सुशोभित दिसणारे नॉर्मन शिल्पाचे नक्षीकाम. **–buoy** नांगराचे ठिकाण दाखविणारा व त्यास जोडलेला बॉया-बोयरा. **–covering machinery** विजेच्या तारेवर असणारा गोफ वगैरे बनविण्याची यंत्रे. **–ducts** चिनीमातीच्या, पोलादी किंवा काँक्रीटच्या (तारांचे दोरखंड जमिनीखालून नेण्याच्या) नळ्या. **Cable's length** (नॉटिकल मैलाचा १/१० = ६०८० ÷ १० = ६०८') ७२० किंवा ६०७ फूट लांबीचे समुद्राची खोली मोजण्याचे माप. **Cable railway, Cable tramcars, Cable way** नजीक नजीकच्या उतारावर माल वहातुकीसाठी केलेला विद्युच्छक्तीने चालणारा सरळ रज्जुगाडी मार्ग किंवा रज्जु ट्राम मार्ग. दोन मनोऱ्यांमधील माल वाहतुकीचा रज्जुमार्ग. **Submarine telegraphic cable** समुद्रातून नेलेली तारायंत्राची तार.

**Cabling** मोठ्या खांबाच्या खाचणीत काढलेला पीळदार कंगोरा-तोडा. स्तंभाच्या खालच्या भागातील गोलचीचे नक्षीकाम.

**Caboose** नौपाकगृह, गलबतावरील स्वयंपाकघर, गलबताचा ओवरा-ओयरा.

**Cacao** दुर्गन्ध, कोकोचे झाड-बी. **Cacodyl** दुर्गान्धिल.

**Cactus** फडचा निवडुंग, पेरकुट, नागफणी.

**Cadastral survey** भूमापन, व्यक्तिभूमापन, स्वामित्व-भूमापन.

**Cade** काष्ठपात्र.

**Cadmium** (कादमियम्) अशुद्ध धातूत असणारे जस्त.

**Cænstone** मलईच्या रंगाचा (फरान्स देशातील केन शहराहून आणलेला) चुन्याचा दगड, (मलईसारखा) केनी दगड.

**Cæsium** सीजियम.

**Caffeine** बुंदिन. **Caffinic acid** बुंदाम्ल.

**Cairn** वरंडा, खिळा, खिळपट, वरवंडी, दगडांची रास. (थडग्यावर किंवा डोंगरावर खुणेदाखल केलेली असते ती), दुर्गक, अश्मकील. **Cairngorm, Cairngorm stone** केर्नगोर्म पर्वतावर सांपडणारा पिवळा व तांबडट रंगाचा स्फटिकमय खडा.

**Caisson** छतातील खोलगट तक्ती, कुसूल, कोठी. बुडलेले जहाज वर काढण्याची जलाभेद्य तरणी (हवा भरण्याचा गोळा), तलपेटिका. **Box caisson, Stranded caisson, American caisson** गोल पूर्वरचित मोठी काँक्रीटची भांडी; ही भांडी प्रथम जमिनीवर इष्ट ठिकाणी ठेवतात व मध्ये खोदाई करून ती उतरवत उतरवत जमिनीत गाडली जातात; पूर्ण उंचीपर्यंत गाडली गेली म्हणजे ती काँक्रीटने अगदी खाली एकथर व अगदीवर एकथर अशी भरली जातात; या दोन काँक्रीटच्या थरामध्ये दगड, गोटे किंवा कधी कधी काँक्रीटही भरतात. **Pneumatic caisson** वायवी कुसूल. माथ्यावर बद असलेली व हवेच्या दाबाने पाणी काढून टाकण्याची व्यवस्था असलेली तरणी.

Caisson : कुसूल

**Caking coal** इष्टकांगार ; ठोकळे पडणारा कोळसा.

**Calcareous** खटिकामय, सितोपलीय, चुन्याचे गुणाचा, चूर्णमय, चुनखडीचा. **–loam** चुनखडीचा गादा, चुनखडीचे गावठण. **–marl** खडूची चिकणमाती. **–sand** रेताड चुनखडी. **–soil** चुन्याची जमीन. **Calcic** खटयुक्त. **Calcify** चुना होणे, खटपूरण. **Calciferous** चूर्णमय, खटमय, सुधामय. **Calcific** क्यालशमचे गुणधर्म उत्पन्न करणारा-केलेला, खटिक. **Calcification** चूर्णस्थिति, चुन्याची स्थिति, चुना करणे, चुना होणे, खटीकरण, खटपूरण. **Calciform** चूर्ण स्थितीचा, चूर्णरूप, खटरूप. **Calcifugous** चूर्ण त्यागी, खटत्यागी. **Calcigenous, Calcigerous** चुना मिसळलेला, चुन्याचा. **Calcimine** भिंतीला लावायचा निळसर चुना, चुन्याने रंगविणे, चूर्णावरण, चूर्णरंजन, खटरंजन. **Calcine** उष्णता लावून भस्म करणे (सुवर्ण, रौप्य, ताम्र इत्यादि) धातु मारणे, भस्म होणे. **Calcinable** भस्म करावयाजोगा. **Calcination** राख करणे, (धातू) मारणे, भस्मीकरण, भस्मीकृति, निस्तापन, प्रतिवाप. **Calcined** भस्म केलेला-झालेला, भस्मीभूत, भस्मीकृत, निस्तप्त, प्रतप्त, मारलेला. **Calciner** भस्म करणारा, मारणारा, भस्म करण्याची भट्टी. **Calcining** निस्तापन. **Calciphobe** चुनाभीत. **Calcite** शिरगोळा, खटिक, चुना, खडू वगैरे खनिज पदार्थ. **Calcium** खट (धातु), खटिक, कलक. **–acitate** खटिक (क्यालशम) आणि शिरक्याचा तेजाब (Acetic acid) ह्यांचे लवण. **–carbonate, carbonate of lime,** $CaCO_3$ खडु-चुन्याचा दगड. **–chloride** खटिक (क्यालशम), आणि हायड्रोक्लोरिक अम्ल ह्यांचे लवण ; ह्याचा मुख्य

धर्म पाणी शोषून घेण्याचा आहे. **–fluoride, $CaF_2$** (**Fluorspar**) गारगोटीचे अशुद्ध मूलद्रव्य, खटफ्लुरिद. **—hydroxide** ओलाचुना, निवळी. **–oxalate** क्याल्शम आणि ऑक्झेलेट अम्ल ह्यांचे लवण; हे लवण पाण्यात अविद्राव्य आहे. **–oxide, CaO** चुनकळी, कळीचा चुना. **–sulphate, Gypsum** खट गंधिक, क्याल्शम आणि गंधकाचा तेजाब (Sulphuric acid) ह्यांचे लवण, ह्याचे दुसरे नाव जिप्सम (Gypsum) असे आहे. हे जिप्सम भाजून 'प्लास्टर ऑफ पारिस' करतात. **Cal'co-graphy** खडिकाचित्र विद्या, काळ्या किंवा रंगीत खडूने चित्र काढण्याची विद्या.

**Calcspar** सुधाकांत.

**Calculated** परिकलित, गणितागत. **Calculation** गणना करणे, गणिताने काढणे, गणना, गणन, परिकलन. **Calculator, Calculating machine, Calculo-graph** हिशेब करणारा, गणनयंत्र, गणित्र, गणक. **Cal-culatory** गणिताचा, गणनात्मक.

**Calculi** अश्मरी, पथरी.

**Calculus** कलन, एक उच्च गणित शाखा (*pl.* Calculi), **–of finite differences** परिमित-परिच्छिन्न अंतर्कलन. **–of functions** फलकलन. **–of operations** कर्मकलन. **–of variations** वैशेषिक कलन, विचरण-कलन. **Differential calculus** विकलन, अंतरकलन-अवकलन-गणित, शून्यलब्धि, चलनकलन, परमाणु-गणित. **Exponential calculus** घातकलन. **Imaginary calculus** कल्पित कलन. **Infinitesimal calculus** सूक्ष्मकलन. **Integral calculus** संकलन, मूलपरिणती, समाहार-समाकलन गणित. चलराशिकलन, पिंडगणित.

**Caldera** ज्वालामुख कुण्ड.

**Calendar** पंचांग, तारिकालय, तारखाळे, कार्यसूची, तारिकावलि, तारखावळ.

**Calender** कपड्याला इस्तरी करून चकाकी आणणारा सांचा. **Calender rollers** अरकसण्याच्या किंवा रंधण्याच्या यंत्रात घालण्याचे लाकूड ज्यावरून सरकत जाते ते रूळ. **Calendering** कपडा साफ करणे, कपड्याला इस्तरी करणे.

**Calibration** परिक्षण, अंशशोधन, समापन.

**Caliber, Calibre** नळीचा आतील व्यास.

**Calibre gun** मैदानी तोफ.

**Calid** उष्ण, गरम. **Calidarium** उष्णोदकगृह. **Calidity** उष्णता. **Caliduct** उष्ण पाणी किंवा हवा वाहून नेण्याची नळी, उष्णतावाही नलिका, उष्णवाहिका.

**Caligraphy, Calligraphy** सुंदर अक्षर लेखन, कलम सफाई, सुंदर लिपी, सुलेख, सुलेखकला, खुशखत, अतिशय बारीक पण सुवाच्य अशी लिहिण्याची कला.

**Caligula** उत्प्रवाहिका.

**Callibrate** मापनांक मांडणे.

**Callipers, Calipers** कैवार, कालिपास, गालीकंपास, ग्यालीपास, मोजकैची, क्यालीपर, मापनकैची. **Hermaphrodite calipers** या कैवाराचा एक पाय सरळ व दुसरा आंत वळविलेला असतो; सरळ पट्टीच्या कडेस समांतर ओळी काढण्यास किंवा एकाबरहुकूम मापे दुसरीकडे दाखविण्यास याचा उपयोग होतो. **Inside calipers** आतील (व्यासाचे) माप घेण्याचा गालीकंपास-कैवार. **Outside calipers** बाहेरील व्यास मोजण्याचा गालीकंपास-कैवार. **Sliding vernier calipers** लघुभागमापक सरक कंपास, याने एका इंचाचा हजारावा किंवा एका मिलिमीटरचा पन्नासावा भाग मोजता येतो. १″=२५ मि.मि. ∴ $\frac{१}{१} \times \frac{१}{२५} \times \frac{१}{५०} = \frac{१}{१२५०}$″ याखेरीज **Jenny, leg point, odd-legs, spring** हे आणखी काही प्रकार आहेत. **Caliper gauge.** पहा Limit gauge.

Calipers: (कालिपास) कवार

**Calk, Cauck** दरजबंदी-दरजगिरी करणे, (गळू नये म्हणून) सांधे भरणे, धार-किनार मारणे, भेगा बुजविणे, सण-डामर करणे. **Calker, Caulker** भेग बुजवणारा. (कडी पाटातील) सांधा-भेगा, चंद्रुसच्या लांभीने बुजवून जलाभेद्य करणारा. **Calking, Caulking** धार बसविणे. **Calking-caulking irons-tool** भेगा बुजवण्याचे हत्यार, धार मारण्याची छिनी.

**Callus** कठिणपणा, घट्टा ; झाडास इजा झाल्यानंतर जी पेशीजालाची वाढ होते तिचा रोख इजा झाकून टाकण्याकडे असतो.

**Calory, Calorie** ओषक, एक किलोग्राम पाणी सेंटिग्रेडच्या शून्यापासून एका अंशापर्यंत तापवण्यास लागणारी उष्णता, उष्णतेचा एक, ओष. कॅलरी उष्णता उत्पन्न करण्याकरिता ४२८०० ग्रॅम सें.मी. कार्य करावे लागते. ह्यालाच ज्यूलचे उष्णतेचे यांत्रिक सममूल्य म्हणतात; ४.१८ ज्यूल. **Food calorie** अन्नाची कॅलरी भिन्न असून ती उष्णतेच्या कॅलरीपेक्षा हजार पटींनी मोठी असते म्हणून तिला 'मोठी कॅलरी' असेही म्हणतात. **Caloric** तेजस्तत्व, उष्णता, उष्णता बीज, उष्णतेचा, उष्णतेसंबंधी. **–engine** उष्णहवेच्या प्रसरणाने चालणारे इंजिन. **–fluid** उष्णताद्रव. **Calorescence** (प्रकाशहीन) उष्णतेचे प्रकाशात रूपांतर. **Caloricity** उष्णतोत्पादन. **Calorific** तापजनक, दाहकारक. **–power** उष्मदायित्व, उष्णदायकता. **–value** ओषमूल्य. **Calorification** उष्णतेची उत्पत्ति. **Calorificient Calorifiant, Calorifacient** उष्णता उत्पन्न करणारा. **Calorimeter** उष्णतामापक यंत्र, उष्णमापक, ओषमापक, कॅलरीमीटर. **Water equivalent of calorimeter** कॅलरीमीटरचे जलसममूल्य. **Calorimetry** उष्णतापन उष्णमापन, उष्णतामापनविद्या. **Kilocalorie** महोष, महौष

**Pound-calorie** प्रोष. **Calorist** उष्णताजडत्ववादी; उष्णता हा जड पदार्थ आहे असे मत प्रतिपादणारा.
**Calotte** उंची वाढविण्यासाठी खोलीच्या छतास दिलेला घुमटाकार. **Calotype, Talbo-type** (सूर्याच्या प्रकाशावरून) काचेच्या ऐवजी कागदावरून उलटेचित्र घेण्याची प्रकाशलेखन पद्धति, फॉक्स टॅलबाटची प्रकाशलेखन पद्धति.
**Caltrop** चार अणकोचीचे लोखंडाचे हत्यार; हे जमीनीवर ठेवले असता त्याचे कोणते तरी टोक वर आलेले असते. ह्याचा उपयोग लढाईत शत्रूच्या घोडेस्वारांचा रस्ता बंद करण्यास करतात.
**Calx** भस्म.
**Calyon** भिंतीच्या बांधकामासाठी वापरण्याचे खडेगोटे -गारगोटा दगड.
**Cam** स्वतः वर्तुल फिरून आपल्यावर अवलंबून असणाऱ्या जिनसाला मागेपुढे किंवा इतर दिशेने फिरविणारे यंत्र, कयाम.
**Cambay stone** अकीक.
**Camber** उभार, बाह्यगोलत्व, उपेट, बांक, नम, भवार, उंचवटा, वितार (रस्ते किंवा गर्डरांना ठेवतात तसा). **—arch** सपाट बहिर्नेमि व भवार दिलेली अंतर्नेमी असलेली कमान; भवार बहुतकरून फुटास $\frac{1}{8}''$ इतका देतात, बाह्यगोल कमान. **—beam** वरील बाजू कमानीसारखी (सपाट धाब्याच्या छपरास आधार देणारी) असलेले बहाल. **—slip** वरील बाजूस भवार असलेले चपटया कमानीच्या विटकामास आधार देणारे लांकूड. **Cambium** कॅंबियम्, एधा.
**Came** खिडक्यांच्या काचकामास फ्रेमीसारख्या खाचा असलेली शिसपट्टी.
**Camel-back truss** क्रमेली सारास.
**Camera** चित्र-प्रतिमायंत्र, न्यायाधिशाची खाजगी बसण्याची खोली, घुमटाकार-धुमट असलेली खोली, शिखरगृह, कोटर.
**Camouflage** छद्मावरण.
**Campa** पट्टी.
**Campaniform** घंटाकृति.
**Campanile, Campceiling** वाशांच्या ढाळाप्रमाणे दोहोबाजूस ढाळ असलेली तक्तपोशी, शिखर, घंटागृह (अलग असलेले). Campanile हा इटालियन शब्द आहे.
**Camphor** कर्पूर, कापूर, रेणुसार. **Camphoric acid** कर्पूराम्ल.
**Camping ground** कापाची जागा, तळ.
**Campostone** श्वेतमृत्तिका.
**Camp-sheathing, Camp sheeting** ६ ते १० फुटावर सोट ठोकून त्यास जोडून आडव्या लाकडांची केलेली आधारभिंत (भराव किंवा चरांच्या धशींना देतात तशी).
**Campus** विद्यानगरी, प्रांगण (विद्यापीठ वगैरे सारख्या संस्थांचे).
**Canada balsam** कानडा बालसम.
**Can** पत्र्याचा डबा (तेलासाठी).
**Canal** कालवा, पाट, नहर, कनाल, सारणी, कुल्या, प्रणाल, प्रणाली, कवाह. **Dual purpose canal** द्विहेतुक कनाल. **Intermittent canal** खण्डल-कनाल, खण्डलक, खंडवाह, खंडवा. **Inundation canal** प्रपूल-कनाल, प्रपूरक. **Irrigation canal** पायनिक कनाल, सिंचाई नहर. **Mainline, Main canal** कुल्या, कालवा. **Mansoon section (of a canal)** (कालव्याचा) पावसाळी विभाग. **Navigation canal** नाविकेय कनाल. **Non-perennial canal** विशिष्ट हंगामापुरतेच क्षेत्रपायन करणारा कनाल, अपरिवार्षिक वाह, मोसमी नहर. **Perennial canal** बारमाही नहर. **Rabi-section (of a canal)** (कालव्याचा) रबी विभाग. **Seasonal canal** फसली नहर. **Weir controlled canal** वीरकायत्त कनाल. **—dam** पाटबंधारा. **—losses, Total losses** समालोप. **—mile** ५००० फूट. **—outlet.** नहर कनाल, निर्या. **-overbridge** दमदमा. **Canalise** कालवा बांधणे, कालव्यासारखा करणे. **Canalisation** कालवे बांधण्याचे काम.
**Candle power** दीप्तिगणक. **Candle** दीपिका.
**Canephoræ** डोक्यावर टोपली असलेल्या स्त्रीचा पुतळा.
**Canker-worm** वाळवी, कसर.
**Canoe** प्लव, डोणी, होडके, पगार.
**Canopy** शामियाना, छत, छप्पर, घटाटोप, पिंजरी, चंबरडोल, मंडपी, वितान, सायवान, चंबरडोली. थडग्यावरची छत्री, छत्र, छादिका, छादन.
**Cant** बाह्यवक्रता, बाह्यकोन, सरळरेषेपासून वाकविणे, कलंडलेली स्थिति, उतार, सज्जाचा धीरा, दाशा, धीरा, गोलाई-ऐवजी सपाट पृष्ठावर कोन असलेले नक्षीकाम. **—bay** तीन बाजवा असलेली खिडकी (बाजूच्या दोन बाजवा भिंतीस तिरक्या असतात). **—board** दोन रुळांच्या उंचीतला फरक दाखविणारी पट्टी. **—brick.** पहा Splay brick. **—rail** छत्राधार. **Canted column** पैलूदार-स्तंभ. **Canted pillar** बहुकोनाकृति खांब. **Canted wall** दुसऱ्या भिंतींशी कोन असलेली भिंत. **Canting strip** जलवाल, पावसाचे पाणी भिंतीवर ओघळू नये म्हणून केलेला निमुळता गलथा.
**Cantilever, Cantalever, Cantaliver** (कंसाकृति) खांबासारखी पल्लेदार कमान-कर्णालंब, कंसतोरण, तीर, बाण, वासा, तुळई आडा, अर्धबहाल, प्रबाहु. **—beam** प्रबाहुका, अर्धबहाल (एक टोक पक्के जोडलेले व दुसरे मोकळे असलेले). **—bridge** समोरासमोरच्या दोन स्तंभांवरील अर्धबहाले गाळ्याच्या मध्यावर एकमेकास भिडून होणारा पूल-प्रबाहूत्तार. **—truss** तीरकैंची (अर्धबहालवजा).

**Canvas texture** गिलाव्याचा शेवटचा हात ओलसर असतानाच त्यावर ओलसर कितान दाबून पृष्ठावर दिसणारे कितानाचे पोत.

**Cap** मथळा, स्तंभशीर्ष, टोपी, शिखर, झांकण. **–iron** रंध्याचे पाते घट्ट बसविण्यासाठी स्क्रूने बसविलेली पट्टी. **–of pier (Newel)** टोपी. **–overpost or column** स्तंभशीर्ष, शिबी. **–over a series of posts** लग.

**Capacitor**. पहा Condenser

**Capacity** बल, सामर्थ्य, क्षमता, धारणा, धारकत्व, आवंका, धारण-शक्ति, आहार, माव, सांच, सांठ, सांठवा, धर, समाई, समावा, कोठा, कोठी, ग्राहकता, ग्रहणशक्ति, घनफळ, पोट, समावेश-शक्ति, आवंका, जलसंचय. **–factor or Plant factor** आवंकांश. **–for heat** उष्णताग्राहकत्व. **–reactance** धारणात्मक अवरोध, प्रत्यवरोध. **Effective capacity** सुचित आवंक. **Flood absorbing capacity** पूरधारणा. **Measure of capacity** कैलीमाप. या उलट वजनी माप.

**Capacitance** धारण विरोध.

**Capillary** परिवाहिनी, केंशीय, बारीक.**—attraction, Capillarity** अनुषंग, अन्वासंग, केशाकर्षण, कैशिकत्व. **–repulsion** प्रतिषंग. **–orifice** कौशिक मुख, कौशिक छिद्र. **–tube** कैशनलिका, केशतुल्य नलिका. **–water** अनुषंगी कैशिकजल, कैशिकेयजल.

**Capita, per** प्रतिव्यक्ति.

**Capital** खांबाचा मथळा, स्तंभशीर्ष, भांडवल, निधि, मुद्दल, मूलधन,

**Capric acid** अजाम्ल.

**Capricorn, Capricornus** मकर, मकर-संक्रांति. **Tropic of capricorn** मकरवृत्त.

**Capstan** कापसिन, मोठाली ओझी उचलण्याचे यंत्र. (दोरखंडाने) नांगर उठविण्याचे यंत्र, उच्चालक. **-headed screw** रुळासारखा माथा असून त्यात भोक असलेला स्क्रू. माथ्यातील भोकात शीग घालून स्क्रू फिरवितात.

Capstan : कापसिन

**Capsule** टोपण, सम्पुट, वेष्टण, कोश.

**Capture** प्रघास, ग्रासणे.

**Caracole** वाटोळा जिना, वर्तुळ सोपान.

**Caramel** दग्धशर्करा, दग्धजा.

**Carbamic acid** कर्बमिक अम्ल. **Carbamide** कर्बमिद, कर्बामोद्य. **Carbide** कर्ब व एखादी धातु यांचा संयुक्त पदार्थ, कर्बाइत, कर्बद. **Carbinal** कर्बनल. **Carbohydrate** शार्कर, कर्बोज्जित-पिष्टपदार्थ, कर्बोज्जमय अन्न, उ. तांदूळ.

**Carbon** शुद्ध कोळसा, कर्ब, अर्व, अर्वातु, **–assimilation** कर्बग्रहण. **–dioxide** कार्बन-द्विकोर्वद, कर्बद्विप्राणिल. **–rod** अर्वकाणु. **Carbonate** कर्बनित, अर्विक, कर्बिक, कार्बनमय लवण. **–of lime** खडू, भाजलेला चुनखडा, चुन्याची कळी. **Carbonic** कार्बनिक, कारबन संबंधी. **–acid** प्राणवायु (Oxygen) आणि कर्ब (Carbon) यांपासून झालेला एक वायुरूप पदार्थ, कर्बिकाम्ल. **Carboniferous** अर्वपूरित, शुद्ध कोळसा उत्पन्न करणारे, कर्बिकमय. **–system** कोळशाचे थर. **Carbonisation** करपणे, कार्बनि-शुद्ध कोळसा बनविणे. **Carbonyl** कर्बिल, कौघटा. **Carburetted** कर्बयुक्त **Carborundum** कार्बन व क्वॉर्टझ यांच्या मिश्रणाचा कृत्रिम दगड. **Carboxyl** कर्बप्राणिल, हृलिक घटा.

**Carcassing timber** इमारतीच्या मांडणीला (खांब, बहालांना) वापरण्याजोगे लाकूड.

**Card-cutting-machine** (चित्रविचित्र) नक्षीकाम बनविणाऱ्या मागास लागणाऱ्या कागदावर छिद्रे पाडण्याचे यंत्र.

**Cardinal point (Compass)** दिग्बिंदु, प्रदिष्ट टिंब.

**Cardiogram** हृच्चलन लेख.

**Carding engine** कापूस पिंजून वात करण्याचे यंत्र.

**Caretaker** अभीक्षक, परिचारक.

**Cargo** भरतुक, नौभार.

**Carmine** किरमिजी रंग. **Carminated** किरमिजी रंग मिसळलेला. **Carminic** किरमिजी रंगाचा.

**Carnarvan arch** दगडी किंवा लाकडी घोड्यांवर टेकलेली छावणी.

**Carnelian** अकीक, गोमेददगड, मांसासारखा तांबडा दगड, लाल गार.

**Carol, Caroll** अभ्यास करण्याची किंवा बसण्याची खिडकी लगतची बैठक, सज्जाबारीतील बैठक-बसण्याची जागा.

**Carpenter** सुतार, बढई, तक्षा, तक्षक, सूत्रधार, तासकाम्या, खरड्या, रथकार, मेस्तरी. सुतारकाम करणे. **–'s bench vice** शेगडा बसविलेला सुतारकामाचा बांकडा. **–'s gouge** गोलपटाशी, नख्या. **–'s horse** (सुतारकामाची) घोडी. **–'s level** लेव्हलबाटली. **–'s square** गुण्या, काटकोन्या, काटकोना. **Carpentry** सुतारकाम, सुतारकी, मयकला. **–shop** सुतारशाळा, बढईखाना, कामठा, सुताराची सुतारकाम करण्याची शाळा-जागा. **Work executed by a carpenter** सुतारकाम.

**Carpet** आस्तरण, आस्तरण घालणे-पसरणे. **–area** बिछायतमाप. **–strip** दरवाजाखाली फरशीवर बसविलेली पट्टी.

**Carralls** लहान अभ्यासिका.

**Carriage** वाहणावळ, वाहतूक, हमाली, परिवहन. **–of a stair** पदतल. पहा Spring trees. **–piece** (विशेषत: रुंद) जिन्याच्या दोन तरकांना जोडणारी आधारकडी. **–porch** देवडी, द्वारमंडप (गाड्या उभ्या करण्याचा). **–way** यानमार्ग, गाडीवाट. **Duel two lane carriageway** दुगाडीवाट. **Single carriageway** एक गाडीवाट.

**Carrickbend**. पहा Knot.

**Carrier** धारक, वाहक, वाहित्र.

**Cartage** मालनेणावळ. **Cartload** गाडीचे भर ओझे. **Cartroad-track, Cart-track** गाडवाट, गाडेवाट, गाडीवाट. **Cart wright** गाड्या करणारा सुतार, गाड्या बांधणारा सुतार.

**Cartesian co-ordinates** कार्तीय निर्देशांक.

**Cartesian diver** डेकार्टचा पाणबुड्या.

**Cartilage** कूर्चा.

**Cartography** नकाशेकला, नकाशे तयार करण्याची कला, नकाशा-शास्त्र, गरहार्ड मेर्काटोर हा ड्यूईसबर्गचा नागरिक या शास्त्राचा जनक होय.

**Cartouche** उलगडलेला नक्षीदार पट दाखविलेले शिल्प.

**Carve** कोरणे, खोदणे, नकसणे, नकासणे, किरवणे, कोरून-खोदून काढणे. **Carved** नकशीदार, खोदीव, कोरीव. **–work** खोदकाम, नकसकाम, नकशी, नकसगिरी कोरलेली मूर्ति. **Carving** कोरणे, खोदणे, कोरीव काम, नक्षीकाम, नकास काम. **–tool** कोरणी, कोरणे. **One who executes carving** नकाशी. **Price of carving** खोदाई, खोदणावळ, कोरणावळ.

**Caryatids** स्तंभासारखा उपयोग केलेले स्त्री आकृती पुतळे; हे पुतळे 'कारिया' येथील ज्या स्त्रिया ग्रीकांविरुद्ध फारशी लोकांना फितूर झाल्या व गुलाम केल्या गेल्या त्यांचे असल्याची दंतकथा आहे. अंगनाकार स्तंभ.

**Cascade** धबधबा, धबधबी, धोत, धोधा, पाणी धो धो पडणे, माला, सांखळी, टप्पे. **–theory** (डॉ. भाभांचा जगप्रसिद्ध) आवर्त सिद्धांत.

**Case, Casing** प्रकार. कवच, आवरण, वेष्टन (ण), कोश, खोळ, अस्तर, आच्छादन-आवरण करणे-घालणे. खिडकी किंवा दार यांना लावलेली जाळी. **General case** साधारण प्रकार. **Particular case** विशिष्ट प्रकार.

**Case hardening** कवच कठीण करणे. लोखंडी (माइल्ड स्टीलचा) वस्तूचा पृष्ठभाग कार्बनच्या योगाने स्टीलसारखा कठीण करण्याची क्रिया. पाणी देण्याकरिता लोखंड पेटीत घालून कडक करणे. लाकूड रापविले जात असताना त्याच्या वेगवेगळ्या थरांना तंतूवरून पार पडणाऱ्या दाबाखाली जो नेट मिळतो ती स्थिति.

**Cased glass** साधी व रंगीत मिळून अशा दोनतीन काचांच्या थरांची बनविलेली काच, पुडाची कांच.

**Casein** किलीट, दधीन, दह्यातील प्रोतीन.

**Casemate** जंगीच्या पाठीमागचे तोफघर, जंगीच्या मागची सुरक्षित जागा.

**Casement window** झरोखा.

**Casern** तटालगत आत शिपायांची आसऱ्याकरिता राहण्याची जागा.

**Casino** खेड्यातली बंगली, आराममंदिर, नृत्यगृह.

**Cast** ओतीव, ओतण, घाट पाडणे, आकार देणे. **–in situ** जागेवर ओतलेले. **–concrete piles** जागेवर ओतलेले सलोह कंक्रीटचे सोट. **Caster** ओतणारा, ओतारी. **Casting** साचा, साच्यात ओतण्याची कृति, ओतकाम, ओतारकाम, ढाळणे, ओतणे. **Chilled casting** अतिशय कडक ओतीव काम.

**Castiron** बीड, ओतीव लोखंड (यात कर्बाचे प्रमाण सर्वात जास्त शकडा ४ या प्रमाणात असते). याचा उपयोग तो वितळून ओतकामाच्या वस्तू तयार करण्याकडे केला जातो. निरुप्त लोह घ. फू. वजन ४५० पौंड. **–steel** वितळून शुद्ध केलेले पोलाद, ज्या पोलादाच्या रसाच्या लांब कांबी करतात ते पोलाद.

**Castle** किल्ला, गढी, दुर्ग. **–nut** षट्कोनी पण माथा दंडगोलाकृति असलेली (बोलटाची) चाकी. हिच्या माथ्यावर सहा केंद्रिक खाचे असून बोलटाच्या टोकात आरपार भोक पाडलेले असते. या भोकाच्या लाईनीत खाचा येईल इतकी चाकी घट्ट करून भोकात चिरकुणी (Split pin) घातल्याने चाकी ढिली होत नाही.

**Castors** खुर्ची-टेबलाच्या पायांस लावलेली लहान चाके.

**Cat's eyes** मांजरडोळे, मार्जारनेत्र; (रस्त्याच्या पृष्ठ-भागात आखीव मार्गदर्शक रेषा दाखविणाऱ्या खुणा; यांचे पृष्ठभाग स्फुरितोत्सर्जित व पैलूदार असल्यामुळे प्रकाशाचे परावर्तन होऊन, रस्त्याने जाणाऱ्या वाहनांचे व ओलांडणीने जाणाऱ्या पादचाऱ्यांचे मार्गदर्शन यांनी उत्तम होते.) लसत्‌रत्न, लसण्या. **Cat's paw knot.** पहा Knot.

**Catacaustic** प्रतिदाहक (वक्रांसंबंधी).

**Catacoustics** प्रतिध्वनिशास्त्र. **Catacoustic** प्रतिध्वनि-संबंधी.

**Catadrome** जड वजने वर उचलण्याचे व खाली नेण्याचे यंत्र, भारउच्चालक.

**Catafalque** प्रेताची पेटी देवळात काही वेळ ठेवण्याचा फलाट.

**Catalyse** उत्प्रेरण. **Catalyser** उत्प्रेरक, निर्देशक. **Catalysis** योगवाही क्रिया, उत्प्रेरण. **Catalyst** निर्देशक, उत्प्रेरक, मध्यस्थ, आवेजक पदार्थ. **Catalytic** योगवाहक, उत्प्रेरक. **–agent** निर्देशक (विक्रिया निर्देशक), **–action** निर्देशन, (विक्रिया निर्देशन).

**Catamaron** काष्ठतरणी.

**Cataphonics** प्रतिध्वनि विचार, प्रतिध्वनिशास्त्र.

**Cataphoresis** विद्युत्‌संचार.

